


जन्मशताब्दी

२००४ - २००५ स्मृती सौरभ ११

# सर्वांसाठी गीता



## एक जीवनग्रंथ

भाग - २

प्रा. द. ना. दुभाषी

॥ वंदे श्री सिद्धराम - काडसिद्धेश्वराभ्याम् ॥

# सर्वांसाठी गीता : एक जीवनग्रंथ

## भाग - १ (अध्याय ५ ते ८)

प्रा. द. ना. दुभाषी

मुद्रण :
देविका आर्ट प्रिंटर्स

मुखपृष्ठ :
कुणाल रेगे

मजकूर तपासणी :
श्री. ज्ञानेश्वर भालेकर

अक्षर जुळवणी :
ओंकार कॉम्प्युटर्स,
डोंबिवली

आवृत्ती पहिली :
जानेवारी - २००५

मूल्य :

प्रकाशक :




ज्ञानम् ● सत्यम ● समता
सिद्धगिरी गुरुकुल फाऊन्डेशन
कणेरी, कोल्हापूर

# प्रस्तावना

भगवान श्रीकृष्णाने अर्जुनाचे निमित्त करून जगाला सांगितलेली व भगवान व्यासांनी श्लोकबद्ध केलेली श्रीमद्भगवद्गीता हे जगातील आश्चर्यांपैकी एक आश्चर्य आहे. प्रा. द. ना. दुभाषी यांनी सहृदय अन्तःकरणाने ते आश्चर्य सर्वांनाच आपले वाटेल व दुरावा नाहीसा होईल अशा रीतीने त्यावर भाष्य केले आहे. प्रा. दुभाषी यांनी लेखमालेच्या स्वरूपात लिहिलेले हे भाष्य अनेकांना खूप आवडल्यामुळे ते त्यात आवश्यक ती भर घालून ग्रंथस्वरूपात प्रसिद्ध होत आहे. जनताजनार्दनाने दिलेली पोच सर्वांत मोलाची असते.

शरद ऋतूतील पूर्णचंद्राकडे जसे सर्व रसिक आकृष्ट होतात त्याप्रमाणे गीतेकडे सर्व सात्त्विक विचारवन्त आकर्षित होतात. दैनंदिन मानवी जीवनातील समस्यांचे भान ठेवून त्यांची व्यवहार, धर्म, नीती व अध्यात्म या चारही स्तरांवरील सोडवण या अद्भुत ग्रंथामध्ये आहे. युद्धातून बाहेर जाण्याचा अर्जुनाचा मोह १) व्यावहारिक दृष्टीने अकीर्तिकर आहे. २) 'मारला गेलास तर स्वर्ग लाभेल' हा धर्मशास्त्राचा निर्णय आहे. ३) युद्धनीतीच्या क्षात्रवृत्तीला ते शोभणारे नाही. ४) 'योगस्थ राहून संग सोडून कर्म कर' हा आध्यात्मिक उपदेश आहे. लेखकाने चारही स्तरांना चांगला न्याय दिला आहे.

गीतेची महाभारताची पार्श्वभूमी लक्षात घेऊन लेखकाने कामक्रोधादिकांचे प्रतिनिधी असलेले कौरव आणि दैवीसंपदेचे प्रतिनिधी असलेले पांडव यांच्या संघर्षाचे चित्र उभे केले आहे. 'जीवन हे कुरुक्षेत्र असून त्याचे धर्मक्षेत्र करण्यात पुरुषार्थ आहे,' हे वाक्य अंतःकरणाला भिडणारे आहे.

भगवान श्रीकृष्ण व त्याचा परमस्नेहीभक्त अर्जुन यांचे अवीट गोड चरित्र प्रारंभी सांगून औचित्य साधले आहे. सत्त्वगुण जेव्हा व्यक्तीचे 'हृदय ढिले' करतो व धर्म-अधर्माच्या संभ्रमाचे विष जेव्हा त्याच्या अंतःकरणात भिनते तेव्हा अर्जुनासारख्या 'नरशार्दूला'शी युद्ध करण्याची हिंमत दुर्योधनासारख्या 'कोल्ह्याला'ही होते. महान पराक्रमाला विवेकाची जोड नसेल तर तोही व्यर्थ ठरण्याची शक्यता असते. अविवेकाला पराक्रमाची साथ असेल तर त्याचाही विजय होण्याचा धोका असतो. उदा. दुर्योधनाचा पक्ष कितीही अन्यायाचा असला तरी त्याला भीष्म, द्रोण व कर्णासारख्या अतिमानुष योद्ध्यांची साथ होती. एकूण ईश्वराच्या राज्यात अन्यायाला पराक्रमाची साथ मिळू शकते! म्हणून न्यायाच्या पक्षानेही प्रचंड सामर्थ्य कमाविले पाहिजे. देवावर भार घालून भागत नाही.

गीतेच्या स्वरूपाची खरी ओळख प्रत्येक अध्यायाच्या शेवटी येणाऱ्या समाप्तीमध्ये आहे. 'श्रीमत् भगवत्गीतासु उपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुन संवादे' असे समाप्तीचे शब्द आहेत. गीतेला शास्त्रामध्ये स्मृती म्हटले आहे. कारण भगवान श्रीकृष्णाने रणांगणावर केलेल्या उपदेशाला भगवान व्यासांनी छंदबद्ध केले आहे. असे असले तरी गीतेला उपनिषदांचे मूल्य आहे. उपनिषदांप्रमाणेच ब्रह्मविद्या हा गीतेचा प्रमुख विषय आहे. ब्रह्मविद्येच्या अनुभवासाठी कर्म, भक्ती, ध्यान व ज्ञान अशा चारही योगांच्या शास्त्रांच्या अभ्यासाची जरूर आहे. क्षराक्षर विभाग, गुणत्तम विभाग इत्यादी योग पूरक आहेत.

हा संवाद कोणा सामान्य व्यक्तींमधील नसून जगद्गुरू भगवान श्रीकृष्ण व अधिकारसंपन्न शिष्य अर्जुन यांच्यातील असल्याने तो संवाद परम श्रद्धेय आहे, हा विचार लेखकाने जागोजागी मांडला आहे.

'जीवो जीवस्य जीवनम्' या गीतेतील सिद्धान्ताचा दोन प्रकारे अर्थ करता येतो. जगण्यासाठी एक जीव दुसऱ्या जीवाला खातो हा पहिला अर्थ असून एक जीव जीवनासाठी दुसऱ्यावर अवलंबून असतो, हा दुसरा अर्थ आहे. कोणताही अर्थ स्वीकारला तरी जीवन संघर्षमय असते हे त्याचे तात्पर्य आहे. ही ईश्वरी व्यवस्था असल्याने अनिवार्य आहे. या संघर्षमय जगात एका व्यक्तीने ज्या तत्त्वज्ञानाच्या आधाराने जगून आपले ऐहिक व पारलौकिक कल्याण साधावे ते तत्त्वज्ञान गीतेत मांडले आहे. प्रारब्ध प्रतिकूल असेल तर सृष्टीच्या झंझावातात (उदा. महायुद्धे, दंगे इ.) किंवा निसर्गाच्या तडाख्यात (उदा. धरणीकंप, वादळे इ.) जीव सापडतो व कदाचित कोणत्याच कल्याणाची संधी न मिळता त्याचे जीवन संपते. पण त्याने त्या दिशेने जे थोडेफार प्रयत्न केले असतील त्यांचे फळ म्हणून त्याला पुढील जन्मात अनुकूलता मिळते. या आश्वासनावर निर्भर राहून व्यक्तीने निष्काम कर्म, निष्काम उपासना, ध्यान व ज्ञान यांची कास धरून आपले जीवन उत्साहाने व आनंदाने जगावे.

ग्रंथाचे परीक्षण किंवा रसग्रहण करणे हा प्रस्तावनेचा हेतू नाही. लेखकाने आरंभलेल्या यज्ञात एक समिधा अर्पावी एवढ्या माफक हेतूने चार शब्द लिहिले आहेत. या यज्ञाचा प्रसाद वाचक व साधकांनी भरभरून ग्रहण करावा, ही भगवान श्रीकृष्ण चरणी प्रार्थना.

**– डॉ. श्रीकृष्ण देशमुख**
मुरगूड, कोल्हापूर

## लेखकाचे मनोगत

श्रीमद्‌भगवद्‌गीता हा केवळ तत्त्वज्ञानाचा, पारायणाचा व पूजेचा ग्रंथ नसून, तो आपल्या लौकिक, व्यावहारिक जीवनाच्या सर्व क्षेत्रांत मार्गदर्शक ठरणारा वैश्विक ग्रंथ आहे. असा हा ऐहिक व पारलौकिक कल्याण करणारा ग्रंथ सर्वांना सहज समजेल अशा सोप्या, सुबोध भाषेतून सांगण्यासाठी, कोल्हापूर येथील 'गीतामंदिर पत्रिके'तून लेखमाला सुरू केली. यामध्ये जून १९९६ पासून डिसेंबर २००१ पर्यंत एकूण ६२ लेख प्रसिद्ध झाले. या पत्रिकेत पानांची मर्यादा असल्यामुळे सुरुवातीस लेखनमर्यादाही आली. त्यामुळे पुनर्लेखन करून याचा थोडा अधिक विस्तार केला. व आज हे पुस्तकरूपाने चार खंडांत प्रसिद्ध होत आहे. गीतेच्या विचारांचा म्हणजे प्रत्यक्ष भगवान श्रीकृष्णाच्या विचारांचा प्रचार व प्रसार करणे म्हणजे भगवंताला आवडणारी खरी भक्ती (अ.१८ श्लोक ६८) असे समजूनच हा प्रयास केला आहे.

प. पू. अदृश्य काडसिद्धेश्वर स्वामी महाराज यांच्या प्रेरणेने व कृपाशीर्वादाने हा संकल्प पूर्ण होत आहे. ब्रह्मलीन जगद्‌गुरू श्री काडसिद्धेश्वर महाराज यांच्या जन्मशताब्दी वर्षाच्या निमित्ताने प. पू. अदृश्य स्वामीजींनी या शताब्दी वर्षात १०० मौलिक पुस्तके प्रसिद्ध करण्याचा शुभ संकल्प सोडला आहे. त्यांच्या या अपूर्व ज्ञानयज्ञात सहभागी होण्याचे परमभाग्य मला लाभले, हे मी माझे पूर्वसुकृत समजतो. गीतेतील संन्यासी हा कर्मयोगी कसा असावा याचा आदर्श, म्हणजे प. पू. अदृश्य स्वामीजी होत. अंतःकरणातून शांत, संन्यस्त व बाहेरून सतत कर्मशील असणारे व जनसामान्यांसाठी कामाचा डोंगर उभा करणारे हे अनासक्त कर्मयोगी आहेत. अत्याधुनिक, सुसज्ज सिद्धगिरी हॉस्पिटल व रिसर्च सेंटर, १०० योगग्रामांची निर्मिती करण्यासाठी, स्त्री-पुरुष योगशिक्षकांना प्रशिक्षित करण्याची योजना, शेतीसाठी व पाणीपुरवठ्यासाठी केलेल्या योजना व त्यात हा ज्ञानयज्ञ... स्वामीजींचे हे सर्व शुभसंकल्प, ईशकृपेने पूर्ण होतील हे निःसंशय! या ज्ञानयज्ञात पुस्तकरूपाने वाहिलेली ही माझी अल्पशी समिधा आहे.

गीता प्रेस, गोरखपूरचे संस्थापक महान भगवद्‌भक्त कै. जयदयाल गोयनका यांचे नातू श्री. माधवप्रसाद गोयनका हे या गीतापत्रिकेचे संस्थापक-संपादक आहेत. त्यांचा गीतेचा अभ्यास व व्यासंग सखोल आहे. श्री. गोयनका यांचे प्रोत्साहन व सहकार्य यामुळे हे लेखन पार पडले, याबद्दल कृतज्ञतापूर्वक मी त्यांचे आभार मानतो. श्री. मुळजीभाई शहा व इतर विश्वस्त यांचाही मी सदैव ऋणी आहे. या पाच वर्षांच्या लेखनकाळात, असंख्य वाचकांनी, पत्ररूपाने पाठविलेल्या बोलक्या प्रतिक्रिया व प्रतिसाद यामुळे उत्साह व बळ लाभले, याबद्दल मी कृतज्ञता व्यक्त करतो.

श्रोत्रिय, ब्रह्मनिष्ठ व प्रसिद्ध प्रवचनकार डॉ. श्रीकृष्ण देशमुख यांची प्रस्तावना या पुस्तकास लाभली आहे. अध्यात्मक्षेत्रात त्यांनी केलेले उत्तुंग कार्य, हे माझ्यासारख्या साधकांना सदैव मार्गदर्शनपर ठरले आहे. त्यांनी तत्परतेने लिहिलेल्या प्रस्तावनेबद्दल मी त्यांचा ऋणी आहे.

गीतेवर भाष्य करण्याचा माझा अधिकार नाही. गीता जशी मला समजली व त्यामुळे माझ्या जीवनात जो मला प्रसाद लाभला, तसा तो सर्वांना मिळावा या हेतूने भक्तिपूर्वक केलेले हे लिखाण आहे. हे अधिकाधिक वाचकांपर्यंत पोहोचावे ही इच्छा केवळ प. पू. अदृश्य स्वामीजींच्या आज्ञेने व आशीर्वादाने पूर्ण होत आहे याबद्दल मी पुन्हा एकदा मनापासून आभार मानून हे मनोगत पूर्ण करतो.

**– प्रा. द. ना. दुभाषी**
नागाळा पार्क, कोल्हापूर.

।। श्री कृष्णार्पणमस्तु ।।

## ॥ ग्रंथदान ॥

ह्या पुस्तकाच्या आर्थिक खर्चाची संपूर्ण जबाबदारी श्री. जयसिंग राजाराम शिंदे (करणूरे) व सौ. शुभांगी जयसिंग शिंदे (कणेरी) यांनी स्वीकारली आहे. सिद्धगिरी मठ संप्रदायाचे त्यांचे कुटुंब हे एक घटक आहे. मठाच्या सर्व प्रकारच्या कार्यक्रमांत ते उत्स्फूर्तपणे सहभागी होतात. मठावर जी विकासकामे होत आहेत त्या सर्वांत आपल्यापरी होईल ती मदत ते करत असतात.

तसे पाहिले तर श्री. जयसिंगराव यांचे कुटुंबीय, आईवडील हे पूर्वीपासून धार्मिक वृत्तीचे आहेत. ब्रह्मकालीन जगद्गुरू काडसिद्धेश्वर महाराज व शिंदे कुटुंबीय, कणेरी ता. करवीर यांचे अगदी जिव्हाळ्याचे संबंध होते. महाराजांच्या आशीर्वादाने व आई कै. सौ. कृष्णाबाई व वडील कै. श्री. राजाराम शिंदे यांच्या स्मरणार्थ महाराजांच्या जन्मशताब्दी वर्षानिमित्त प्रकाशित होणाऱ्या १०० पुस्तकांपैकी 'सर्वांसाठी गीता - एक जीवनग्रंथ' (भाग - २) या अकराव्या पुष्पाचे ग्रंथदान करण्याचा मान त्यांना मिळत आहे.

काडसिद्धेश्वर महाराज व शिंदे घराणे यांच्या अतूट नात्याची जपवणूक करण्याचे काम त्यांचे वारसही करत आहे.

त्यांच्या आई कै. सौ. कृष्णाबाई व वडील कै. राजाराम या नेहमी आपल्या कुटुंबीयांना सांगत की, आपल्या उत्पनातील काही भाग नेहमी दीन-दलित यांच्यासाठी तसेच धार्मिक कार्ये व शिक्षणासाठी खर्च करावेत. त्यांच्या प्रेरणेनेच 'दाता' बनण्याचे महान कार्य श्री. जयसिंग शिंदे व सौ. शुभांगी शिंदे व शिंदे कुटुंबीय करत आहे.

हे कुटुंब नेहमी आनंदी राहो. अन्नधान्य, पुत्रपौत्रादी यांच्या माध्यमातून कुटुंबातील लोक समाधानी राहोत, तसेच शिंदे (करणूरे) व माने कुटुंबातील सर्वांना ईश्वर भरपूर आयुरारोग्य देवो, हीच ईश्वरचरणी प्रार्थना.

**श्री. जयसिंग राजाराम शिंदे यांचा वंशावळ नकाशा पुढीलप्रमाणे**



## अनुक्रमणिका

i) प्रस्तावना : डॉ. श्रीकृष्ण देशमुख

ii) लेखकाचे मनोगत

१) अध्याय पाचवा १

२) अध्याय सहावा २५

३) अध्याय सातवा ४८

४) अध्याय आठवा ७२

## अध्याय पाचवा
# कर्मसंन्यासयोग

चौथ्या अध्यायात कर्म, अकर्म, विकर्म यांचे स्वरूप आपण पाहिले. कर्माचे 'अकर्म' होणे हेच आपले खरे ध्येय आहे. अनेक कर्मे संसारात करीत असताना पद्मपत्राप्रमाणे अलिप्त कसे राहायचे व निष्काम भावाने ती कशी पार पाडायची, यासाठीच भगवंतांनी तीन अध्यायांचे (३, ४, ५) आयोजन केले आहे.

कर्म हा आपल्या अंतःकरणाचा, मनाचा आरसा आहे. आपली अंतःस्थिती दर्शवणारा, मनातील काम, क्रोध, लोभ व इतर विकार प्रगट करणारा साक्षीभूत, बोलका पुरावा आहे. प्रपंचात, सार्वजनिक जीवनात, व्यवसायात हरघडी अनेक प्रकारची कर्मे आपल्या हातून घडत असतात. ही कर्मे कधी स्वधर्माचरणाच्या मर्यादेत होतात तर कधी त्याविरुद्ध होतात. अहंकार, अज्ञान, आसक्ती, लोभ इ. विकारांनी दूषित झालेली कर्मेसुद्धा हातून घडत असतात. म्हणून साधकाच्या, भक्ताच्या जीवनात कर्माला भक्तीचा, ज्ञानाचा सुगंध आला पाहिजे. प्रत्येक कर्म, ज्ञान, भक्तीने युक्त असेल तरच ते आनंददायक व उत्कर्षवर्धक होते. अशा कर्मामुळे आत्मसमाधान तर होतेच पण इतरांनाही ते मार्गदर्शक ठरते. संतांचे प्रत्येक कर्म सहजच असे होत असते. महापुरुषांच्या हातून घडणारे प्रत्येक कर्म हे अकर्म, विकर्म या स्वरूपाचेच होते. त्याचे कारण मन, अंतःकरण शुद्ध असते. कर्माचा हेतू निर्मळ असतो. ''सहज बोलणे हितोपदेश' या वृत्तीप्रमाणे ज्ञानी साधकाचे कर्मदेखील सत्कर्म होत असते. आई जशी मुलाच्या बाबतीत मायेने, वात्सल्याने सहजकर्मे करीत असते तसेच संतांचे प्रत्येक कर्म हे सहजच चाललेले असते व ते उपकारक, कल्याणप्रद ठरत असते. तसे कर्म घडणे हाच कर्मयोग आणि कर्म हातून घडत असताना आतून निर्विकार, अलिप्त, आसक्तीविरहित राहणे यालाच संन्यस्त वृत्ती म्हणतात. बाहेरून प्रवृत्ती व आतून निवृत्ती असणाऱ्यांचे कर्म हे जणू दैवी कर्म ठरते. कर्म करूनही करीत नाही असे जे वाटणे तोच संन्यास! निष्काम कर्म हे जेव्हा ज्ञानपूर्वक होते तेव्हा ते असे संन्यासरूप होते असा विषय या पाचव्या अध्यायात भगवंतांनी विशद केला आहे. पूर्णावस्थेत कर्मत्याग व कर्मयोग दोन्हीही सारखेच. कारण ज्ञान दोन्ही ठिकाणी आहे. तिसऱ्या अध्यायापासून भगवंतांनी पुन्हा-पुन्हा प्रतिपादिलेला 'संन्यस्त' शब्द (३.४, ३.३०, ४.४१) अर्जुनाला पुन्हा समजून घ्यायचा आहे. म्हणून अर्जुन पहिल्याच श्लोकात भगवंताला प्रश्न करतो,

**संन्यासं कर्मणां कृष्ण पुनर्योगं च शंससि ।**
**यच्छ्रेय एतयोरेकं तन्मे ब्रूहि सुनिश्चितम् ।।१।।**

''हे कृष्णा, कर्माचा त्याग करावा (असे तू सांगतोस) आणि पुन्हा कर्माचे अनुष्ठान करावे असे(ही) तू सांगतोस. या दोहोंपैकी खरोखर (तुझ्या मताने) जे श्रेयस्कर असेल ते मला एक निश्चित सांग.'' ।।१।।

''मयि सर्वाणि कर्माणि संन्यस्य अध्यात्मचेतसा'' असे तिसऱ्या अध्यायात (श्लोक ३०) भगवंतांनी सांगितलेले अर्जुनाच्या डोक्यात आहे. असे जर घडले तर उगाच युद्ध तरी कशाला करा, असा भ्याडपणाचा, कर्मत्यागाचा विचारदेखील त्याला आला आहे. 'संन्यासाच्या' काही विपरीत कल्पना अर्जुनाच्या मनात आल्या आहेत. अशा गोंधळलेल्या मनःस्थितीत विचारलेला हा प्रश्न आहे.

तसा हा प्रश्न तुमचा-आमचा सर्वांचाच आहे. मनःशांतीसाठी प्रपंच टाकून किंवा न करता हिमालयात जाणारे महाभाग व प्रपंचातच राहून सर्व कर्मे निष्काम भावनेने करणारे कर्मयोगी यात श्रेष्ठ कोण? अहो, टाकतो म्हटले तरी कर्म टाकता येते का? कर्मे संन्याशालासुद्धा चुकली आहेत का? **'न हि कश्चित् क्षणमपि जातु...' (३.५)** एक क्षणसुद्धा माणूस कर्मावाचून राहूच शकत नाही ही वस्तुस्थिती असताना खऱ्या अर्थाने कर्मसंन्यास होईल का? मनात आसक्ती असेल आणि बाहेरून कर्मे सोडलेली असतील तर एकांतात जाऊनसुद्धा मनःशांती लाभेल का?

म्हणून अर्जुनाच्या प्रश्नाचे महत्त्व. या प्रश्नाने कर्माविषयीच्या निश्चित कल्पना भगवंतांनी कथन केल्या आहेत. श्रीकृष्ण म्हणतात,

**संन्यासः कर्मयोगश्च निःश्रेयसकरावुभौ ।**
**तयोस्तु कर्मसंन्यासात्कर्मयोगो विशिष्यते ।।२।।**

''कर्माचा त्याग आणि कर्माचे अनुष्ठान ही दोन्ही श्रेयाला (मोक्षाला) कारणीभूत आहेत, पण या दोहोंपैकी कर्मत्यागापेक्षा कर्मयोगच (तो सर्वांस सुलभ असल्याने) विशेष (श्रेयस्कर) आहे.'' ।।२।।

कर्मसंन्यास व कर्मयोग हे दोन्ही मार्ग मोक्ष प्राप्त करून देणारे आहेत, पण या दोहोंमध्ये कर्मयोगाची श्रेष्ठता अधिक आहे. सांख्य व कर्मयोग हे भिन्न आहेत असे अज्ञ लोक म्हणतात. यापैकी एकाचे जरी अनुष्ठान केले तरी ते करणाऱ्याला दोहोंचेही फलप्राप्त होते. सांख्य व कर्मयोग हे एकच आहेत असे जाणणारा खरा ज्ञाता होय. पण कर्मयोगावाचून कर्मसंन्यासाची प्राप्ती होणे दुष्कर आहे. पहिल्या दहा श्लोकांपर्यंत ही एकवाक्यता सांगताना संन्यासी कोणाला म्हणावे याचे सुंदर विवरण तिसऱ्या श्लोकामध्ये आले आहे. हा श्लोक मननीय, चिंतनीय असा आहे -



**ज्ञेयः स नित्यसंन्यासी यो न द्वेष्टि न काङ्क्षति ।**
**निर्द्वन्द्वो हि महाबाहो सुखं बन्धात्प्रमुच्यते ।।३।।**

''हे महाबाहो अर्जुना, जो कोणाचा द्वेष करीत नाही व कशाची इच्छा करीत नाही असा (कर्मयोगी) नित्य संन्यासीच जाणवावा. (रागद्वेषादी) द्वंद्वरहित असलेला तो बंधापासून सहज (अनासायाने) मुक्त होतो.'' ।।३।।

संन्यास म्हणजे 'सम्यक् न्यासः ।' न्यास म्हणजे ठेवणे. ज्याला उत्तम तऱ्हेने ठेवणे जमले त्यालाच संन्यासी म्हणायचे. संन्यासी म्हणजे शून्यात पाहणारा व भगवे कपडे परिधान करून निःसंग होऊन राहणारा, अशी एक सर्वसाधारण परिभाषा आहे. प्रपंचापासून अलिप्त असणारा व कोणतीच व्यावहारिक कर्मे न करणारा, स्वस्थ पडून राहणाराच संन्यासी, अशी एक आपली कल्पना आहे. पण खरे म्हणजे बाह्य वेषावरून व वर्तनावरून संन्यासी न ठरविता तो आतून कसा आहे यावरच त्याची संन्यस्त वृत्ती अवलंबून आहे. ज्याच्या बुद्धीत कर्तव्याशिवाय अन्य कोणतीही कामना नाही व त्यामुळे ज्याचे मन कशातही आसक्त झालेले नाही असा कर्मयोगीदेखील संन्यासीच म्हटला पाहिजे. अशा संन्याशाला प्रपंच, नियतकर्मेसुद्धा सोडायची काही गरज असत नाही. जो मनानेच असा निःसंग झाला आहे अशा संन्यस्त साधकालाच शाश्वत सुखाचा, शांतीचा झरा प्राप्त होतो; कारण **'मन एव मनुष्याणां कारणं बन्धमोक्षयोः ।'** (विष्णुपुराण). बन्ध व मोक्षाला कारण असणारे जे मन तेच निःसंग झाले असल्यामुळे तो कोणाचा द्वेष, मत्सर करीत नाही. त्याच्या ठिकाणी 'अहं'चा नाश झाल्याने त्याला कशाची आशा-आकांक्षा, इच्छा, तृष्णा राहत नाही. सुख-दुःख, सिद्धी-असिद्धीमध्ये ज्याचे मन अचल, स्थिर असते असा साधक कर्मयोगी होऊनदेखील नित्य संन्यासीच असतो. संन्यासी नेमके कोणाला म्हणावे त्याची व्याख्या ज्ञानेश्वर माऊली ह्या श्लोकावरच्या निरूपणात सुस्पष्ट करतात -

**आणि मी माझे ऐसी आठवण ।**
**विसरले जयाचे अंतःकरण ।**
**पार्था तो संन्यासी जाण ।**
**निरंतर ।।२०।।**
**जो मने ऐसा जाहला ।**
**संगी तोचि सांडिला ।**
**म्हणोनि सुखे सुख पावला ।**
**अखंडित ।।२१।।**

''ज्याच्या अंतःकरणामध्ये 'मी' व 'माझे' याचे स्मरणच राहिले नाही. अर्जुना, तो सदोदित संन्यासीच आहे, असे तू जाण. ज्याच्या मनाची अशी

तयारी झाली त्याला संगच सोडून जातात म्हणून त्याला शाश्वत सुखाची अनायासे प्राप्ती होते.''

आपण सर्वजणच या अर्थाने 'असंन्यासी'! आपली सर्व सुख-दुःखे या 'मी', 'माझे' यातच गुंतलेली असतात. सकाळी जाग आल्यानंतर सर्वप्रथम या 'मी'पासूनच सुरुवात होते. मी, माझा देह, माझे कुटुंब, माझे घर, माझी संपत्ती, माझी कीर्ती, माझे सुख... 'मी व माझे' हे शेवटच्या श्वासापर्यंत माणसाला सोडवत नाही व ज्या-ज्या गोष्टींना 'माझे' म्हणून कवटाळलेले असते, त्या कोणत्याच गोष्टी देह सोडताना आपल्याबरोबर येत नाहीत, हीच मानवी जीवनाची शोकांतिका आहे. ज्या देहाचे लाड, चोचले करीत असतो तो देह नाशवंत तरी आहेच पण त्यावरदेखील आपली सत्ता चालत नसते. तरीही 'माझा देह' म्हणून त्याला कुरवाळत असतो. देहाच्या अवस्था प्रत्येक क्षणी बदलत असतात. कौमार्य, यौवन, जरा, मरण हे येत असताना आपल्या इच्छेला इथे काहीच अर्थ नसतो. प्रकृतिगुणानुसार हे सर्व चाललेलेच असते. तरीदेखील 'अहं'मुळे आपणच 'कर्ता' आहोत, असे अज्ञानाने म्हणत असतो. ज्याला आत्म्याचे अविनाशित्व व क्षणभंगुर नाशवंत देहाचे 'अनित्यत्व' समजले तो 'मी, माझे' याच्या पलीकडे जगतो. मनाने जो असा झाला तोच संन्यासी!

गीतेमध्ये, ज्ञानेश्वरीमध्ये संन्यासाची व्याख्या इतकी स्पष्ट आहे. केवळ भगवे कपडे परिधान करून प्रपंच सोडलेला संन्यासी नव्हे. एखादी व्यक्ती सुटाबुटात वावरत असेल व मनाने निःसंग असेल तर तो कर्मयोगी असूनदेखील कर्मसंन्यासीच! व एखादी व्यक्ती भस्म लावून, भगवी वस्त्रे परिधान करून वावरत असेल पण आसक्ती सुटलेली नसेल, इच्छा, वासनांच्या गर्तेत सापडला असेल तर तो संन्यासी कसा होईल? गीता या सर्व संकल्पनांचे पूर्ण स्पष्टीकरण देते. निःशंक करून सोडते. कोणत्याही प्रकारची संदिग्धता गीतेत नाही हेच गीतेचे वैशिष्ट्य आहे. 'कर्म करा' हाच गीतेचा संदेश आहे. गीता माणसाला कार्यप्रवण करते. कर्म उत्तम कसे करायचे व कर्मबंधनातून कसे युक्तीने सुटायचे त्याचा परिपाठ या तीन अध्यायांत भगवंतांनी दिला आहे -

या दृष्टीने सातवा श्लोक या अध्यायाचा सारभूत असा सुंदर श्लोक आहे -

**योगयुक्तो विशुद्धात्मा विजितात्मा जितेंद्रियः ।**
**सर्वभूतात्मभूतात्मा कुर्वन्नपि न लिप्यते ।।७।।**

''योगयुक्त, निष्काम कर्मयोगाच्या ठिकाणी रत असलेला, विशुद्धात्मा (शुद्धचित्त), विजितात्मा (आत्मानंदी), जितेंद्रिय (ज्याचा इंद्रियांवर ताबा आहे) व सर्वभूतात्मभूतात्मा (ज्याचा आत्मा सर्व भूतांच्या ठिकाणी असणारा जो आत्मा त्याच्याशी एकरूप झाला आहे), असा मनुष्य कर्म करीत असला, तरी त्यापासून अलिप्त असतो.'' ।।७।।



कर्मापासून अलिप्त असणारा, कर्मबंधनातून मुक्त असणारा योगी कसा असतो याचे सुंदर विश्लेषण या श्लोकात आहे. पाचव्या अध्यायातील कर्मसंन्यासाचे संपूर्ण विवरणच या एका श्लोकात आले आहे. योगयुक्त, विजितात्मा, विशुद्धात्मा, जितेंद्रिय व सर्वभूतात्मभूतात्मा या पाच गोष्टी योगयाच्या जीवनात आल्या तर तो कर्मे करूनही अकर्ता राहतो, अलिप्त राहतो.

योगयुक्त पुरुष भगवंताशी जोडला जातो. 'युक्त' म्हणजे जोडला गेलेला. जो विभक्त नाही तो भक्त. भगवंताशी जर संबंध जोडायचा असेल तर भक्त-भगवंताची पत्रिका जमावी लागते. या आध्यात्मिक लग्नात भक्ताच्या ठायी जर काही दैवी गुण असतील तरच ही पत्रिका जमते. तेराव्या अध्यायातील ज्ञानाचे १८ गुण, बाराव्या अध्यायातील 'अद्वेष्टा'पासून 'स्थिरमतिः'पर्यंत असणारे भक्ताचे ३६ गुण किंवा सोळाव्या अध्यायातील दैवी गुणसंपदा ही भक्ताची गुणसंपदा भगवंतांनी गीतेमध्ये पुन्हा-पुन्हा सांगितली आहे. भगवंताशी नाते जोडायचे तर भक्ताच्या पात्रतेचे हे निकष आहेत. व्यवहारातसुद्धा विवाहानंतर पती-पत्नीला किती गोष्टी सोडाव्या लागतात? लग्नापूर्वी असलेल्या सवयी, इच्छा, आकांक्षा यामध्ये केवढी तडजोड करावी लागते? मी असा आहे... माझी आवड ही आहे... मला हे चालणार नाही... हे सर्व शब्दप्रयोग बदलावे लागतात. पति-पत्नीतल्या एकवाक्यतेमध्ये जर एवढी तडजोड करावी लागते, तर प्रत्यक्ष भगवंताशी जोडले जाण्यासाठी भक्ताला अंतर्बाह्य किती बदलावे लागेल. असे आमूलाग्र परिवर्तन करणे हीच आध्यात्मिक साधना. भक्ती म्हणजे वृत्ती. अशी वृत्ती अंगी येणे म्हणजेच भक्त होते.

**काम क्रोध आड पडले पर्वत ।**
**राहिला भगवंत पलीकडे ।।**

मी व भगवंत यांमध्ये काम, क्रोध, लोभ यांचे पर्वत आहेत. 'अहं', 'वासना', 'विकार' यांनी अंतःकरण दूषित झाले आहे. इंद्रिये विषयाधीन आहेत. मनात वासना चिकटलेल्या आहेत. बुद्धीतून कामना गेलेल्या नाहीत आणि मला भगवंताशी नाते जोडायचे आहे, हे कसे शक्य होईल? जोपर्यंत आपण अहंकाररहित व वासनारहित होत नाही तोपर्यंत विशुद्ध भक्ती होणे असंभव! भगवंताशी जोडले जाण्यासाठी अंतःकरणाची शुद्धता पाहिजे. मन-बुद्धी दिव्य बनली पाहिजेत. 'माझे, मी'पण विसर्जित केले पाहिजे. समुद्रात मीठ पडले नाही तोपर्यंत ते वेगळे, अल्प दिसते. मग ज्या वेळी त्याचा समुद्राशी संयोग होतो त्या वेळी ते समुद्राएवढे होते. त्याप्रमाणे संकल्पापासून दूर केल्यामुळे ज्याचे चित्त (चिद्रूप) ('सच्चिदानंद' आत्मस्वरूपाशी युक्त) झाले, तो **'आत्मन्येवात्मना तुष्टः' (२.५५)** सदैव आत्म्याच्या ठिकाणीच संतुष्ट राहतो. तो परिच्छिन्न दिसला तरी त्याने

तिन्ही लोक व्यापले आहेत. त्याचे कर्ता-कर्म-कार्य ही त्रिपुटीच संपुष्टात येते. खरा 'कर्मसंन्यास' तो हाच. मिठाच्या समर्पक दृष्टान्ताद्वारे ज्ञानेश्वरांनी हे विशद केले आहे.

जो योगयुक्त असतो त्याची सर्व कर्मे भगवंताला अर्पण झालेली असतात. कर्मे करताना 'मी केवळ निमित्तमात्र आहे, भगवंताचे साधन आहे' अशी त्याची दृढ भावना असते. असे अर्पण करावयाचे कर्म विशुद्ध, वासनारहित असल्याशिवाय भगवंताच्या चरणी रुजू होत नाही. असा योगयुक्त पुरुष अंतःकरणातून शुद्ध असतो. आत्मशुद्धता ही परमार्थातील अत्यंत महत्त्वाची गोष्ट आहे.

**रात्रंदिवस आम्हा युद्धाचा प्रसंग ।**
**अंतर्बाह्य जग आणि मन ।।**

जगद्गुरू तुकारामांच्या या उक्तीप्रमाणे आंतरिक शुद्धतेसाठी खरोखरच युद्धाचा प्रसंग उभा राहतो. जन्म-जन्मांतरीचे संस्कार अंतर्मनात चिकटून बसलेले असतात. अनंत विषयांच्या गाठींची बंधने, वासनांची जळमटे, क्रोध, अहंकार इ. दडलेले असतात. अंतःकरणाच्या शुद्धतेसाठी या सर्वांचे उदात्तीकरण, विभूतीकरण झाल्याशिवाय भगवंताच्या राज्यात प्रवेशच नाही. अंतःकरणशुद्धता हा परमार्थाचा पाया आहे. बाह्यशुद्धता ही आतील शुद्धतेवरच अवलंबून आहे. या श्लोकात 'सर्वभूतात्मभूतात्मा' असे वर्णन आहे. पुढे सहाव्या अध्यायात याचे विस्तृत वर्णन येणार आहे. प्रत्येक प्राण्यात, भूतमात्रात ईश्वराचा अंश आहे. प्रत्येकात असलेल्या या शुद्ध चैतन्याकडे जो 'आत्मौपम्येन' म्हणजे **आत्मभावाने (६.३२)** पाहतो, त्यालाच **'सर्वभूतात्मभूतात्मा' (६.७)** म्हणायचे. गीतेमध्ये भगवंतांनी आपले अस्तित्व सर्वांच्या हृदयामध्ये आहे याचा पुन्हा-पुन्हा उच्चार केला आहे. **'ममैवांशो जीवलोके'... (१५.७), 'अहं आत्मा गुडाकेश सर्वभूताशयस्थितः'... (१०.२०), 'सर्वस्य चाहं हृदि संनिविष्टो'... (१५.१५), 'ईश्वरः सर्वभूतानां हृद्देशेऽर्जुन तिष्ठति...(१८.६१)** अशा अनेक श्लोकांतून भगवंतांनी आपला ठावठिकाणा, पत्ता आपल्याला सांगितला आहे. हृदयातल्या रामाला ओळखून जो दुसऱ्यातला राम पाहतो, तोच खऱ्या अर्थाने **'सर्वभूतहितेरताः' (५.२५, १२.४)** ही असतो. ही जीवनदृष्टी येणे हीच भक्तीची अंतिम अवस्था आहे. अशांकडून जी मानवतेची कामे होतात त्यालाच सुगंध असतो. एरव्ही तथाकथित समाजसुधारकाकडून मानवतेची म्हणून जी कामे होतात, त्यात ही बंधुत्वाची, एकत्वाची भावना नसते. आपण सर्वजण त्या एकाच भगवंताची लेकरे आहोत, याची जाणीव होऊन तशी वृत्ती होणे म्हणजेच भगवंताशी जोडले जाणे. सर्व संतांकडे ही दृष्टी होती. त्यांचे सहज बोलणे हा हितोपदेश व सहज कृती ही भगवंताचेच दैवी काम होत असते. अशा दैवी-गुणसंपन्न योगयुक्तांकडून



कितीही कर्मे झाली तरी त्या कर्मांनी ते लिप्त होत नसतात.

निष्काम कर्म जेव्हा ज्ञानपूर्वक होते तेव्हा ते संन्यासरूपच होते. पूर्णावस्थेत संन्यास (कर्मत्याग) व कर्मयोग दोन्हीही सारखेच. ज्याच्या बुद्धीत कामना नाही, मन अनासक्त आहे, निःसंग आहे, तो निरहंकारी होऊन नियतकर्मे करीत असलेला कर्मयोगीदेखील संन्यासीच! असा जो योगयुक्त असतो त्याची सर्व कर्मे भगवंताला अर्पण झालेली असतात. 'मी' केवळ निमित्तमात्र असून, भगवंताचे साधन आहे या भावनेनेच, अशी विशुद्ध, वासनारहित कर्मे भगवंताला अर्पण केलेली असतात. असा योगयुक्त निरंतर, अक्षयसुखात डुंबत असतो.

योगयुक्त पुरुषाने सर्व क्रिया करीत असताना 'मी काहीच करीत नाही' हा भाव ठेवावा असे आठव्या व नवव्या श्लोकात प्रतिपादन केले आहे. यापुढील १० वा श्लोक हा महत्त्वाचा व सुंदर श्लोक आहे.

**ब्रह्मण्याधाय कर्माणि सङ्गं त्यक्त्वा करोति यः ।**
**लिप्यते न स पापेन पद्मपत्रमिवाम्भसा ।।१०।।**

ब्रह्माचे ठायी अर्पण करून आसक्तीविरहित जो कर्मे करतो त्याला कमळाच्या पानाला जसे पाणी, त्याप्रमाणे पाप चिकटत नाही. शुद्ध कर्मे भगवंताला अर्पण करीत असताना आपली वृत्ती अनासक्त कशी असावी याचे उत्तम वर्णन दिव्याच्या प्रकाशाचा दृष्टान्त देऊन ज्ञानेश्वर माऊलींनी केले आहे.

**दीपाचेनि प्रकाशे । गृहींचे व्यापार जैसे ।**
**देही कर्मजात तैसे । योगयुक्ता ।।४९।।**
**तो कर्मे करी सकळे । परी कर्मबंध नाकळे ।**
**जैसे न सिंपे जळी जळे । पद्मपत्र ।।५०।।**

दिव्याच्या उजेडावर ज्याप्रमाणे घरातील व्यवहार चालतात त्याप्रमाणे योगयुक्ताची सर्व कर्मे देहात चालतात. ज्याप्रमाणे कमळाचे पान पाण्यात असून पाण्याने लिप्त होत नाही, त्याप्रमाणे असा योगयुक्त सर्व कर्मे करतो; परंतु कर्मबंधनाने आकळला जात नाही.

सर्व व्यवहार होत असताना दिव्याला त्याचे काहीच सोयरसुतक नसते. दिवा निश्चल, सुखदुःख-द्वंद्वरहित व निर्लेप असतो. तसा योगयुक्त प्रपंचातच असतो, जगाचे सर्व व्यवहार इतरांसारखेच करीत असतो. पण इतरांत व त्याच्यात आंतरिक फरक असतो. 'मी प्रकाश देतो', ही भावनासुद्धा जशी दिव्याला नसते तसे 'मी कर्मे करितो' अशी अहंकारबुद्धी न ठेवता आसक्ती सोडून तो कर्मे करीत असतो व अशी कर्मे केल्यामुळे आत्मशुद्धी तर होतेच पण ते कर्मदेखील वासनारहित असल्यामुळे शुद्ध होते. अशीच कर्मे भगवंताला अर्पण करावयाची असतात.

अनासक्तीचा दिव्य मंत्र भगवंतांनी या श्लोकातून आपणास दिला आहे. महात्मा गांधींनी गीतेतील हा अनासक्तियोगच जीवनात आचरून दाखविला. लोकमान्य टिळकांनी कर्मयोगाचा पुरस्कार केला, श्रीमद्‌भगवान शंकराचार्यांनी ज्ञानयोगाचे प्रतिपादन केले, ज्ञानेश्वर माऊलींनी गीतेतून भक्तियोग प्रभावीपणे मांडला, पण महात्मा गांधींनी अनासक्तियोग हाच गीतेचा संदेश मानून तसे जीवनभर आचरण केले.

सामान्य साधकानेच नव्हे तर सर्वसामान्य माणसाने जरी ठरविले तरी अशा प्रकारची बौद्धिक अनासक्ती जीवनात आणणे अशक्य नाही. कर्माच्या ठिकाणचा आपला सर्व कर्तृत्वभाव ईश्वराच्या ठिकाणी अर्पण केल्यानेच कर्माचा दोष आपल्याला चिकटणार नाही. मन आहे तोपर्यंत आसक्ती ही राहणारच. पण आपले 'स्व' स्वरूप समजून कर्मे केल्याने त्याची तीव्रता मात्र कमी होईल. मी त्या शाश्वत, अनंत भगवंत तत्त्वाचाच अंश आहे असे समजून हातून घडलेले कर्म हे सामान्य कर्म राहत नाही. तो 'कर्मयोग'च होतो. सभोवार घडणाऱ्या घटनांचा तसेच त्याच्याकडून होणाऱ्या कर्मांचा तो साक्षीभावाने अनुभव करीत असतो. कर्म पूर्णपणे अलिप्त करावयाचे. ज्या कर्मापासून मी कोणत्याही फलाची अपेक्षा करीत नाही ते शुद्ध, निर्दोष कर्म, असे गीता सांगते. अशा प्रकारचे शुद्ध कर्मच ईश्वराला अर्पण करायचे असते. ज्या कर्मात वासना, आसक्ती शिल्लक आहे असे दोषयुक्त कर्म भगवंत कसे स्वीकारील? त्यामुळे योगयुक्त तोच की जो वासनारहित व अहंकाररहित शुद्ध कर्म करतो. जो युक्त म्हणजे योगयुक्त झाला तो कर्मफल सोडून देऊन शाश्वत शांतीचा अधिकारी होतो व जो अयुक्त म्हणजे योगयुक्त नाही तो वासनेच्या योगाने फलाच्या ठिकाणी सक्त होऊन बंधनात सापडतो. असा विचार ११ व्या व १२ व्या श्लोकात प्रतिपादिला आहे. ते श्लोक असे -

**कायेन मनसा बुद्ध्या केवलैरिंद्रियैरपि ।**
**योगिनः कर्म कुर्वन्ति संगं त्यक्त्वाऽत्मशुद्धये ।।११।।**
**युक्तः कर्मफलं त्यक्त्वा शान्तिमाप्नोति नैष्ठिकीम् ।**
**अयुक्तः कामकारेण फले सक्तो निबध्यते ।।१२।।**

"म्हणून कर्मयोगी आसक्ती सोडून (मी करतो अशी अहंकारबुद्धी न ठेवता) अंतःकरणाच्या शुद्धीसाठी केवळ इंद्रियांनी, शरीराने, मनाने किंवा बुद्धीने कर्मे करतात." ।।११।।

"जो युक्त म्हणजे योगयुक्त झाला तो कर्मफल सोडून देऊन अखेरची पूर्ण शान्ती मिळवितो आणि अयुक्त म्हणजे फलासक्त मनुष्य, फळाची वासना ठेवून कामे करतो. म्हणून तो कर्मबंधनात अडकतो." ।।१२।।



जी व्यक्ती योगयुक्त होते ती अंतःकरणाने शुद्ध होऊन प्रभूशी जोडली जाते. ती अहंकाररहित व आत्मशुद्ध झाल्याने अशा व्यक्तीला परम शांती प्राप्त होते. पण जो पुरुष प्रपंचाच्या द्वंद्वात सापडला आहे तो सतत अशांत, दुःखी होतो. कर्मबंधनातूनसुद्धा त्याची सुटका नसते. एक कर्म करूनसुद्धा सुखी व दुसरा कर्म करून दुःखी. जो कर्म करीत असताना फळाची अपेक्षा ठेवत नाही त्याला द्वंद्वे छळत नाहीत, पण जो केलेल्या कामाचे फळ मागतो तो अशांत व खिन्न होतो, कारण हे जीवन पूर्णपणे मान-अपमान, आशा-निराशा, सुख-दुःख, शान्ती-अशान्ती... अशा द्वंद्वांनी भरलेले आहे. कोणासाठी काहीतरी चांगले आपण केले की, त्याने निदान थँक्स धन्यवाद म्हणावे अशी अपेक्षा करतो. एखाद्या सामाजिक संस्थेत, संघटनेत एखादा जीवापाड काम करतो व अपेक्षा ठेवतो की माझ्या कामाचे मूल्य समजून लोकांनी आपला सन्मान करावा. आणि हे घडले नाही की मनुष्य अशांत, त्रस्त, दुःखी होतो. कुटुंबातसुद्धा स्त्री सकाळपासून मेहनत घेत असते. सुंदर स्वयंपाक करते. व पतीकडून प्रशंसेचा एक शब्द तरी ऐकायला मिळावा, म्हणून मनातून अपेक्षा करते. ती जर पूर्ण झाली नाही तर अस्वस्थ होते. मुलांना मोठे करताना स्वतःच्या सुखाची तिलांजली देऊन केवढा त्याग आपण करतो. मुलगा कर्तृत्ववान होऊन म्हातारपणाचा आधार होईल अशी अपेक्षा ठेवून जीवन काढतो. या अपेक्षा पूर्ण झाल्या नाहीत की दारुण दुःखाशिवाय हाती काहीच लागत नाही. पावलोपावली द्वंद्वांनी भरलेल्या या जगात, कर्म कसे करावे व सुख कसे मिळवावे, याचा मार्ग गीताकारांनी दाखविला आहे. कामना ठेवली की, अशांती आली व अनासक्त राहून, कर्तव्यकर्म म्हणून स्वधर्म पार पाडला तर प्रसन्नता व सुख प्राप्त होतेच.

या १२व्या श्लोकापासून २१व्या श्लोकापर्यंत भगवंतांनी अशा कृतकृत्य झालेल्या योगयुक्त पुरुषाची लक्षणे सांगितली आहेत. हे सर्व श्लोक म्हणजे सातव्या श्लोकावरील **(योगयुक्तो विशुद्धात्मा विजितात्मा...)** भाष्यच आहेत. त्यातील १६ व १७ हे 'विशुद्धात्मा'वरील तर १८ व १९ हे 'विजितात्मा'वरील भाष्य आहेत. १३व्या श्लोकात 'जितेंद्रिया'चे वर्णन आहे.

**सर्वकर्माणि मनसा संन्यस्यास्ते सुखं वशी ।**
**नवद्वारे पुरे देही नैव कुर्वन्न कारयन् ।।१३।।**

सर्व कर्मांचा मनाने (साक्षात नव्हे) संन्यास करून, जितेंद्रिय देहवान (पुरुष) नऊ द्वारांच्या या (देहरूपी) नगरात काही न करिता व न करविता आनंदाने राहतो (देहाची नऊ द्वारे म्हणजे दोन कान, दोन डोळे, नाकाची छिद्रे, एक तोंड, ही सात दारे शरीराच्या वरच्या भागात आणि मल-मूत्र विसर्जन करणारी दोन दारे - गुदद्वार व जननेंद्रिय ही शरीराच्या खालच्या भागात आहेत.)

फलाची इच्छा असलेल्या इतर पुरुषांप्रमाणे तो सर्व कर्मे करतो व नंतर आपल्या हातून ती गोष्ट घडलीच नाही अशा अकर्तेपणाच्या भूमिकेतून तो उदासीन राहतो. तो जिकडे पाहतो तिकडे त्याला सर्व सुखमय सृष्टी दिसते. स्वतः आनंदी राहतो व सहवासात आलेल्यांनाही आनंदी करतो. पूर्णपणे आत्मनिग्रही होऊन तो देहवान आत्मा नऊ दारे असलेल्या नगरात सुखाने राहतो. ज्याने अहंकारकेंद्रित आणि वासनाप्रेरित कर्मांचा त्याग केला आहे असा आत्मनिग्रही पुरुष अंतःकरणात अनिर्वचनीय, अक्षय आनंदाचा अनुभव करीत असतो. कठोपनिषदात वापरलेले नऊ द्वारांचे हे अतिशय समर्पक रूपकच या श्लोकात वापरलेले आहे. शरीराला महत्त्वाची नऊ द्वारे असलेले 'किल्ला'रूपी शहर मानले आहे. या जड देहाचा निर्देश करण्याकरिताच हे रूपक आहे. अशा देहात आत्मा काहीही न करता (राजाप्रमाणे) केवळ अस्तित्वाने ज्ञानेन्द्रिये (कान, नाक, डोळे, जीभ व त्वचा) व कर्मेन्द्रिये (हात, पाय, वाणी, जननेंद्रिय व गुद) यांच्यामार्फत सर्वांचे नियंत्रण करतो. अशा प्रकारची व्यक्ती आत्मतत्त्वाशी एकरूप होऊन प्रकृतीच्या स्तरातील स्फुरण पावणाऱ्या सर्व घटना, क्रिया, कर्मे यांचा केवळ साक्षीभावाने अनुभव घेत असते. स्वतः काही कर्म करीत नाही आणि दुसऱ्यांनाही कर्म करण्यास कारणीभूत होत नाही. **(नैव कुर्वन्न कारयन्).**

१४व्या व १५व्या श्लोकांत भगवंतांनी आणखी एक अद्‌भुत कर्मरहस्य सांगितले आहे. मी 'अद्‌भुत' एवढ्यासाठीच म्हणतो की, ते आपल्या आजवरच्या प्रचलित कल्पनांना, धारणांना धक्का देणारे आहे. गीतेचे तत्त्वज्ञान रोखठोक आहे. इथे भ्रामक समजुतींचा घोटाळा नाही. नाहीतर आध्यात्मिक प्रांतातसुद्धा काही कमी घोटाळे नाहीत! आपल्या १८ पुराणातून खूप खूप सुंदर पौराणिक कथा आहेत. त्या देव-देवतांच्या रम्य कथांचा उद्देश, वास्तविक काही तरी सुंदर तत्त्व बिंबविण्याचा असतो. पण ही तत्त्वे राहतात बाजूलाच व आपण मात्र त्या कथातील गूढ, अद्‌भुत विश्वातच रमत असतो. चित्रगुप्त आपल्या पाप-पुण्यांचा हिशोब ठेवतो व मृत्यूनंतर त्याचे न्यायदान करून स्वर्ग-नरक या ठिकाणी त्याची रवानगी करतो, ही त्यांतील एक सुंदर कल्पना. देव आपल्या पाप-पुण्याकडे स्वर्गातून पाहत असतात अशी आपली पुराणकथांनी करून दिलेली समजूत.

गीतेत भगवंतांनी ही गोष्ट स्पष्ट केली आहे. भगवान सांगतात,

**न कर्तृत्वं न कर्माणि लोकस्य सृजति प्रभुः ।**
**न कर्मफलसंयोगं स्वभावस्तु प्रवर्तते ।।१४।।**
**नादत्ते कस्यचित्पापं न चैव सुकृतं विभुः ।**
**अज्ञानेनावृतं ज्ञानं तेन मुह्यन्ति जंतवः ।।१५।।**



"प्रभू म्हणजे आत्मा किंवा परमेश्वर लोकांचे कर्तृत्व, त्यांची कर्मे किंवा त्यांना मिळणारी फळे यांचा रचयिता नसतो. हे सर्व स्वभावतः प्रकृतीच्या नियमाप्रमाणे (कर्मसिद्धान्ताप्रमाणे) घडत असंते." ।।१४।।

"विभू म्हणजे सर्वव्यापी आत्मा किंवा परमेश्वर कोणाचे पाप किंवा पुण्यहीं घेत नाही. ज्ञानावर अज्ञानाचे पांघरूण पडले असल्यामुळेच (मायेनेच) मनुष्यप्राणी मोह पावतात." ।।१५।।

कर्मसिद्धान्ताप्रमाणे, प्रकृतीच्या नियमानुसार मनुष्याला आपले प्रारब्ध भोगावेच लागते. संचित कर्मे ही भात्यात ठेवलेल्या बाणासारखी असतात, पण प्रारब्ध हे धनुष्यातून सुटलेल्या बाणासारखे असते. तो आपल्या लक्ष्याप्रत जाणारच. प्रारब्ध भोगल्याशिवाय कोणाचीही सुटका नाही. भोगणे हे अपरिहार्य आहे. कोणी महान तपस्वी, ज्ञानी, संत, योगी जरी असला तरी प्रारब्ध भोगल्याशिवाय त्याच्या देहाला गती नाही. ज्ञानी पुरुष किंवा साधक या प्रारब्धाला धैर्याने तोंड देतात तर इतरांना ते असह्य जरी असले तरी भोगावे लागते. दशरथ राजाला कैकेयीच्या वराप्रमाणे रामाला वनवासात धाडावे लागते. त्या वेळी भरताला अतिशय दुःख होते, तेव्हा त्याची समजूत काढण्यासाठी महर्षि वसिष्ठांनी जो उपदेश केला तो असा -

**सुनहु भरत भावी प्रबल बिलखि कहेउ मुनिनाथ ।**
**हानि लाभु जीवनु मरनु जसु अपजसु बिधि हाथ ।।**
(तुलसी रामायण-अयोध्याकांड-१७१)

हानी-लाभ, जीवन-मरण, यश-अपयश, हे सर्व प्रारब्धाधीन असते. हानी होणे अगर लाभ होणे, जगणे अथवा मरणे, सर्व प्रारब्धात निश्चित झालेले असते त्याप्रमाणेच होते.

गोस्वामी तुलसीदासांनी हे सत्य रामायणात समर्पकपणे सांगितले आहे.

कौसल्येला तिच्या उतारवयात राम-सीतेला वनवासात धाडणे भाग पडले. त्यांचा राज्याभिषेक पाहणे तिच्या प्रारब्धात नव्हते. अहिल्येचे प्रारब्ध इतके चांगले की, तिला प्रभू रामचंद्रांच्या चरणरजस्पर्शाने पुन्हा जीवन प्राप्त झाले, शबरीला भगवंताचे दर्शन घडले. पण राजा दशरथाला पुत्र-वियोगाच्या दुःखाने मृत्यूला सामोरे जावे लागले. परब्रह्म श्रीरामही आपल्या पित्याचे मरण टाळू शकले नाहीत. प्रारब्ध, कर्मफलसिद्धांत किती बलवान आहे हेच यावरून दिसते.

रावण भगवान श्रीशंकराचा परमभक्त होता, वेद-पारंगत होता, महाज्ञानी होता, मंदोदरी नावाची सुंदर, साध्वी स्त्री, त्याची पट्टराणी होती. एवढे असूनही प्रारब्धवशात त्याची बुद्धी फिरली व सीताहरण करून राज्य गमावले व मृत्यूही स्वीकारावा लागला.

कौरव-पांडवामध्येसुद्धा हेच घडले. दोघेही गुरू द्रोणाचार्यांचे शिष्य. धर्म-अधर्म याची पूर्ण कल्पना दोघांनाही होती. तरीही दुर्योधन असा का वागला? स्वतः दुर्योधनच म्हणतो,

**जानामि धर्मं, न च मे प्रवृत्तिः । जानामि अधर्मं, न च मे निवृत्तिः ।।**
**केनापि देवेन हृदि स्थितेन । यथा नियुक्तोऽस्मि तथा करोमि ।।**

''धर्म मी चांगल्या तऱ्हेने जाणतो, पण धर्माने वागण्याची माझी प्रवृत्ती होत नाही. अधर्म काय हेही मी जाणतो, पण अधर्माने वागल्याशिवाय माझ्याने राहावत नाही. माझ्या हृदयात असलेली कोणीतरी देवता मला अशा रीतीने वागण्यास भाग पाडते. मी त्या देवतेच्या हातातील कळसूत्री बाहुले आहे. मला त्या देवतेकडून जशी प्रेरणा मिळते तसा मी वागतो.'' देवता म्हणजे जुना संस्कारही म्हणता येईल.

केवढी ही अगतिकता, असहाय्यता!! माणसाच्या अंतःकरणात असलेल्या वासना, कामना त्याला प्रारब्धानुसार नाचवितात. त्याची बुद्धी कर्मानुसारिणी होते. प्रत्यक्ष राम-कृष्णासारखे अवतार जेव्हा जगात अवतरले तेव्हासुद्धा त्यांना या कर्मसिद्धान्ताप्रमाणे प्रकृतीच्या नियमानुसारच वागावे लागले.

ज्या दिवशी सकाळी, चक्रवर्ती राजा बनून रामाला सिंहासनावर बसावे लागणार होते त्याच दिवशी सकाळी जटाधारी तपस्व्याच्या वेशात वनवासाला जावे लागले. प्रत्यक्ष परब्रह्म असूनसुद्धा ते हे टाळू शकले नाहीत. या सर्व गोष्टी पुराणातल्या नव्हेत, तर प्रत्यक्ष दैनंदिन जीवनातसुद्धा हेच घडते. मती गुंग होणाऱ्या अशा विपरीत घटना घडतात, दिसतात. कर्मसिद्धान्ताचा, नियतीचा, प्रारब्धाचा, प्रकृतीच्या नियमांचा उलगडा न झाल्याने ईश्वराच्या अस्तित्वासंबंधीच मग तो शंका घेऊ लागतो. श्रद्धेला तडे पडायला लागतात. ''हे असे कसे?'' म्हणून बुद्धिवादी वाद घालायला लागतात. बुद्धिवंतानासुद्धा शंकांनी घेरले जाते. ''हा देव इतका निष्ठुर कसा हो?'', ''या ईश्वराच्या दरबारात काही न्याय आहे की नाही?'' भूकंप, अवर्षण, महापूर अशा नैसर्गिक आपत्तींनी जेव्हा मनुष्यहानी अपरंपार होते तेव्हा ईश्वराच्या दयाळूपणाविषयी आशंका येते. निरीश्वरवाद्यांना स्फुरण चढते. सज्जनांना अपरिमित कष्ट भोगावे लागतात तर दुर्जनांना सर्व ऐहिक सुखे सहजसाध्य प्राप्त होतात, ईश्वरभक्तांना न्याय मिळत नाही व ईश्वरतत्त्वाला न मानणाऱ्यांची चंगळ असते. असे सर्व विपरीत घडते. अशा सर्व शंकांना या दोन श्लोकांमध्ये भगवंतांनी उत्तर दिले आहे.

सर्वेश्वर अकर्ता आहे. कोणत्याही कर्माने तो लिप्त होत नाही. सर्व कर्मामध्ये तो उदासीन आहे. सर्व सृष्टी निर्माण करतो. त्याच्याच सत्तेने हे विश्व चालते.



उत्पत्ती, स्थिती, लय हे सर्व त्याचेच आहे. पण या सर्व क्रियांत तो अनासक्त आहे. प्राणिमात्रांच्या पाप-पुण्याचा तो साक्षीही होऊन राहत नाही. सगुणरूपाने तो क्रीडा करतो पण निर्गुणपणाला मलिनपणा येत नाही.

हे ज्ञान ज्या वेळी होते त्या वेळी ईश्वर आपल्या पाप-पुण्याच्या व इतरही कर्मात 'अकर्ता' आहे. असे चित्ताला पटते. 'मी'सुद्धा त्याचाच अंश असल्याने स्वभावतः 'मीही अकर्ताच' असावयास पाहिजे. असे जर घडले तर पाप-पुण्य, सुख-दुःख, भेदाभेद हे राहीलच कसे?

ब्रह्माचे ठायी आसक्तीविरहित कर्मे जो अर्पण करतो त्याला कमलपत्राप्रमाणे पाप चिकटत नाही. अनासक्त बुद्धीने शुद्ध कर्मे भगवंताला अर्पण केल्याने तो कर्मबंधनातही अडकत नाही. कर्माच्या ठिकाणचा कर्तृत्वभाव ईश्वरार्पण झाल्याने कर्माचा दोषही आपल्याला चिकटणार नाही. अशा प्रकारची बौद्धिक, मानसिक अनासक्ती आपल्या जीवनात आणणे हीच भक्ताची साधना आहे. ज्या कर्मापासून कोणत्याही फलाची अपेक्षा नसते ते निर्दोष कर्म! परमेश्वर अकर्ता आहे. आपल्या पाप-पुण्याच्या सर्व कर्मात व त्यापासून मिळणाऱ्या फळातदेखील तो अकर्ता आहे, उदासीन आहे; जीवदेखील त्याच ईश्वराचा अंश असल्याने स्वभावतःच तो अकर्ता आहे. आपलीही सर्व कर्मे जर अशी घडली तर?... अशा योगयुक्त, विजितात्मा पुरुषांच्या जीवनाचे चित्रण या अध्यायाच्या उत्तरार्धात भगवंतांनी केले आहे.

पण तत्पूर्वी 'प्रारब्ध-संचित-क्रियमाण' या विषयावरील प्रारब्ध-पुरुषार्थ यातील नेमकी म्हणून त्यासंबंधी थोडे विवेचन सीमारेषा पाहिल्याशिवाय हा अध्याय पूर्ण होणार नाही. भगवंतांनी गीतेत कर्मसिद्धीच्या पाच कारणांमध्ये दैवाला पाचवे स्थान दिले आहे. प्रारब्ध-पुरुषार्थाचा विषय या कर्मसिद्धान्ताशी जोडला गेला असल्याने ह्या विषयाचा येथेच परामर्श घेणे आवश्यक ठरते. १८ व्या अध्यायात गीताकार म्हणतात,

**अधिष्ठानं तथा कर्ता करणं च पृथग्विधम् ।**
**विविधाश्च पृथक्चेष्टा दैवं चैवात्र पञ्चमम् ।। (१८-१४)**

''कर्म पार पाडायचे असेल तर अधिष्ठान (शरीर), कर्ता ('मी' हा कर्ता), ज्ञानेंद्रिये, कर्मेंद्रियामुळे होणाऱ्या कृती किंवा व्यापार व पाचवे दैव!''

या ठिकाणी दैवाला पाचवे स्थान दिलेले आहे. आपण मात्र दुबळेपणाने प्रारब्धाला प्रथम (मुख्य) स्थान देत असतो. यासाठी आपली धर्मशास्त्रे, संतपुरुष, अवतार यांनी प्रारब्ध-पुरुषार्थाच्या बाबतीत केलेला उपदेश तंतोतंत समजून घेऊन आचरणात आणणे आवश्यक आहे. प्रारब्ध कर्माला 'अदृष्ट' असे म्हणतात. कारण पूर्वजन्मात आपण कोणती कर्मे केलेली आहेत व ती कोणत्या स्वरूपाचे

प्रारब्ध बनून आपल्यासमोर ठाकली आहेत याबद्दल आपण अनभिज्ञ असतो. ते कर्म भोगण्यासाठीच तसे अनुरूप शरीर, योनी प्रत्येक जीवाला प्राप्त होत असते व प्रारब्ध कर्मे भोगल्यानंतरच ते शरीर सुटते. हा जरी सिद्धान्त असला तरी प्रखर पुरुषार्थ करून ते सौम्य करणे आपल्या हाती आहे. कारण क्रियमाण कर्मांची निर्मिती आपण आपल्या इच्छांनुसार करू शकतो. नैतिक व आध्यात्मिक उन्नतीसाठी प्रभु-भक्ती, सत्संग, नामस्मरण, शास्त्रपठण, ईश्वराची कामे व त्यानुसार केलेला प्रबळ पुरुषार्थ प्रारब्धानुसार मिळालेले दारुण दुःख सौम्य करू शकतो. कारण सुख-दुःखाकडे बघण्याची समदृष्टी केवळ अध्यात्मज्ञानानेच प्राप्त होऊ शकते.

प्रत्येक मनुष्याला कर्मस्वातंत्र्य आहे. म्हणूनच सहाव्या अध्यायात या प्रयत्नवादाचा स्पष्ट उच्चार गीता करते.

**उद्धरेदात्मनात्मानं नात्मानमवसादयेत् ।**
**आत्मैव ह्यात्मनो बंधुरात्मैव रिपुरात्मनः ।।६.५।।**

"(मनुष्याने) आपण होऊन आपला उद्धार करावा. आपण आपल्या स्वतःला (कधीही) खचवू नये. कारण (प्रत्येक मनुष्य) आपणच आपल्या स्वतःचा बंधू किंवा आपणच आपला शत्रू म्हटला आहे."

आपला उद्धार करून घ्यायचा असेल तर त्याला दैव नव्हे, आपणच सर्वस्वी जबाबदार आहोत, असा स्पष्ट निर्वाळा गीतेने दिला आहे. ज्या वेळी आत्मविकासाची कर्मे हातून घडतात तेव्हा पुरुषार्थाला प्राधान्य आहे व दैवाचे स्थान दुय्यम आहे आणि जेव्हा जीवनात सुख-दुःखे, लाभ-हानी होते तेव्हा दैवाचे स्थान प्रधान असते व प्रयत्न किंवा पुरुषार्थ गौण असतो. दैव व पुरुषार्थ यातील नेमकी सीमारेषा ही आहे. ही स्पष्ट कल्पना जर असेल तर आपले कर्मस्वातंत्र्य अबाधितच राहील हे निःसंशय.

**स्वल्पमप्यस्य धर्मस्य त्रायते महतो भयात् ।।२.४०।।** "धर्माच्या थोड्याशासुद्धा आचरणाने भय-मुक्ती होऊ शकते." **न हि कल्याणकृत्कश्चिद्दुर्गतिं तात गच्छति ।।६.४०।।** "कल्याणकारक कर्म करणाऱ्या कोणत्याही पुरुषासबाबा रे! दुर्गती मिळत नाही" - हे भगवंतांनी अर्जुनाला दिलेले आश्वासन आहे.

**प्रयत्नाद्यतमानस्तु योगी संशुद्धकिल्बिषः ।**
**अनेकजन्मसंसिद्धस्ततो याति परां गतिम् ।।६.४५।।**

"प्रयत्नाने उद्योग करता करता पापापासून शुद्ध होत्साता कर्मयोगी अनेक जन्मांनंतर सिद्धी पावून अखेर उत्तम गतीस पोहोचतो." प्रयत्नवाद हा गीतेचा प्राण आहे. गीता दैवाधीन व्हायला प्रवृत्त करत नाही. **इहैव तैर्जितः सर्गो येषां साम्ये स्थितं मनः ।।५.१९।।** याच इहलोकात समत्वबुद्धी साधून मृत्युलोक जिंकता येतो म्हणजे जीवनमुक्तावस्था प्राप्त करता येते.



**कर्मण्येवाधिकारस्ते मा फलेषु कदाचन ।।२.४७।।** - तू नुसते कर्म करीत जा. अमुक एक कर्म शेवटास नेऊन त्याचे फळ मी भोगीन हे म्हणू नको. सदोदित कर्म करीत राहा. एक क्षणही रिकामा घालवू नको. हा गीतेचा संदेश आहे.

सर्वांच्या अंतर्यामी एकाच परमेश्वराचा वास आहे, प्रत्येक जीवात्मा हा परमात्म्याचा अंश आहे अशी दृढ श्रद्धा निर्माण झाली की, प्रत्येक जण आपापल्या परीने आपला उद्धार करावयास स्वतंत्र आहे. अशा श्रद्धेने केलेले थोडेसेसुद्धा धर्माचरण आपल्या उद्धारास कारणीभूत ठरते, हा गीतेचा दिलासा आहे. **'शिवोऽहं'** - 'मी शिवरूप आहे' म्हणत सतत कर्मरत राहिले पाहिजे. अशी आत्मश्रद्धा जेव्हा निर्माण होते तेव्हा **'कर्तुमकर्तुम् अन्यथा कर्तुं'** 'करणे, न करणे किंवा इतर काही करणे' म्हणजेच सर्व काही करण्याची शक्ती माझ्याजवळ आहे' याची जाणीव व्हायला लागते. **'अहं ब्रह्मास्मि' (बृ.उ. १.४.१०)** - 'मी ब्रह्म आहे'; **'तत्त्वमसि' (छा.उ. ६.९.४)** - 'तो तूच आहेस' हेच सर्व श्रुतींचे सांगणे आहे. वेदान्तांच्या अशा सर्व सिद्धान्तांचे सूत्रबद्ध व संक्षिप्त सार म्हणजे गीता आहे. अशी सामर्थ्याची जाणीव जर मनुष्यास झाली तर तो प्रारब्धाचा-दैवाचा विचारही करणार नाही. मी जर 'अमृतस्य पुत्र' आहे तर या सामर्थ्याच्या व श्रद्धेच्या बळावर मला जगात काय अशक्य आहे?

आपले अज्ञान हेच आपल्या साऱ्या दुःखाचे मूळ आहे. असे आपली उपनिषदे सांगतात. गीता हेच प्रतिपादते. ज्ञानाने सर्व कर्मे दग्ध होतात. चौथ्या अध्यायात ज्ञानाचा महिमा आपण पाहिला आहे. मी कोण आहे? याची जाणीव जर मनुष्यास झाली तर या 'स्व'चे सामर्थ्य त्याला ईश्वराप्रत नेणार नाही का? आपण अज्ञानामुळे, अश्रद्धेमुळे व संशयामुळे दुबळे आहोत. सिंहाचे छावे असून बकऱ्यासारखी जगणारी दुबळी, भयभीत, असहाय्य माणसे आहोत. गीता, उपनिषदे, महाभारत, रामायण हे सर्वच ग्रंथ जीवनदायी अमृताचा सागर आहेत. प्रत्येक मनुष्याच्या अंतःकरणातच सुखाचा, आनंदाचा झरा आहे. **'स्वाध्यायान्मा प्रमदः'** किंवा **'स्वाध्यायप्रवचनाभ्यां न प्रमदितव्यं' (तै. उ. १.११)** हा ऋषिमुनींचा आपल्याला कंठरवाने केलेला उपदेश आहे. आपली संस्कृती, शास्त्रे माणसाला दुबळे होण्याचा संदेश देत नाहीत. सतत अभ्यास, प्रयत्न, स्वाध्याय करा व शतायुषी होऊन आनंदाने जगा. **'नंदाम शरदः शतम् । जीवेम शरदः शतम् । अजिताः स्याम शरदः शतम् ।'** अशी विजिगीषु वृत्ती व तेजस्वी जीवनवाद आपल्या वेदांनी उभा केला आहे. ईशावास्योपनिषदातील दुसऱ्या मंत्रात ऋषी हे जीवनरहस्य सांगतात -

**कुर्वन्नेवेह कर्माणि जिजीविषेत् शतम् समाः ।**
**एवं त्वयि नान्यथेतोऽस्ति न कर्म लिप्यते नरे ।।**

''कर्मयोग करीत करीत १०० वर्षे जगण्याची इच्छा ठेवा. कर्मयोग करणाऱ्या व्यक्तीला कर्म चिकटू शकत नाही. यापेक्षा कर्मबंधनातून मुक्त होण्याचा दुसरा कोणताही मार्ग नाही.'' कर्मयोग्यासच, अशा रीतीने पुरुषार्थ करणाऱ्यालाच, जगण्याची कला (art of living) माहीत आहे. मांगल्याकडे नेणारे जे कर्म आहे तेच करा हा श्रुतींचा आग्रह आहे. आणि हाच गीतेचा 'निष्काम कर्मयोग' होय!

असा शक्तिशाली मंत्र मिळालेला असतानासुद्धा आपल्या एकूण तत्त्वज्ञानाबद्दल स्वकीयांच्या व परकीयांच्या मनात विपर्यस्त व असत्य तत्त्वज्ञान का घुसले? त्याचे कारण धर्मातून बुद्धिप्रामाण्य निघून गेले. श्रुती, स्मृती गेल्या व पुराणांचे प्राबल्य वाढले. कर्मकांडाचा प्रादुर्भाव झाला. चुकीच्या व समाजाला अधःपतनास नेणाऱ्या घातक रूढी शास्त्रापेक्षा श्रेष्ठ मानल्या जाऊ लागल्या. त्यामुळे 'पुरुषार्थ' लोपला व एकूण भारतीय समाजाला काही शतके अवकळा आली. त्यामुळे जीवनात विषमता, पराङ्मुखता, दुबळेपणा, पराधीनता व दैववाद थैमान घालू लागला. **'सर्वस्य चाहं हृदि सन्निविष्टः ।' (१५.१५)** - 'मी सर्वांच्या हृदयात आहे' - हा भगवंताचा उपदेश लोक विसरले. त्यामुळे जाती-जातीतले दुजाभाव, वैरत्व वाढले व मनुष्य पराधीन व्हायला लागला. **'दुर्लभं भारते जन्म'** अशी स्थिती असणाऱ्या भारतात परकीयांनी आक्रमण करून जाती-जातीतील वैमनस्यांनी व स्पृश्य-अस्पृश्य भेदांनी पोखरलेल्या समाजाचे शोषण केले, धर्मांतर केले.

या सर्व अधःपतनाचे कारण, आपल्याच वैभवशाली, विजिगीषु, अमृततुल्य व जगाला मार्गदर्शन करू शकणाऱ्या तत्त्वज्ञानाचा आपल्याला झालेला विसर. हे तत्त्वज्ञान आपण श्रद्धा व बुद्धी ह्यांनी समजून घेतले तर आपण प्रारब्धवादी, दैववादी न बनता पराक्रमी व पुरुषार्थवादी बनू, हे निःसंशय!

ज्ञानी, योगयुक्त झालेल्या पुरुषाची जीवनदृष्टी कशी असते याचे विवरण पुढील श्लोकांतून भगवंतांनी केले आहे -

**विद्याविनयसंपन्ने ब्राह्मणे गवि हस्तिनि ।**
**शुनि चैव श्वपाके च पंडिताः समदर्शिनः ।।१८।।**
**इहैव तैर्जितः सर्गो येषां साम्ये स्थितं मनः ।**
**निर्दोषं हि समं ब्रह्म तस्माद्ब्रह्मणि ते स्थिताः ।।१९।।**
**न प्रहृष्येत्प्रियं प्राप्य नोद्विजेत्प्राप्य चाप्रियम् ।**
**स्थिरबुद्धिरसंमूढो ब्रह्मविद् ब्रह्मणि स्थितः ।।२०।।**



**बाह्यस्पर्शेष्वसक्तात्मा विंदत्यात्मनि यत्सुखम् ।**
**स ब्रह्मयोगयुक्तात्मा सुखमक्षय्यमश्नुते ।।२१।।**

''अशा ज्ञानी लोकांना विद्याविनययुक्त ब्राह्मण, गाय, हत्ती, तसेच कुत्रा आणि चांडाळ हे सारखेच वाटतात. (त्यांची दृष्टी या सर्वांच्या ठिकाणी सारखीच असते. ।।१८।।

''याप्रमाणे ज्यांचे मन समभावात स्थिर झाले ते, जिवंत असतानाच जन्ममृत्युरूप संसार जिंकतात. कारण ब्रह्म हे समरूपाने व्यापलेले असून त्यामध्ये कोणताही दोष नाही. म्हणूनच समभावात असलेले ज्ञानी ब्रह्मस्वरूपातच स्थिर राहतात.'' ।।१९।।

''अशा रीतीने ब्रह्मरूपात स्थिर असलेला ब्रह्मज्ञानी संशयरहित असतो. त्याची बुद्धी स्थिर असते. प्रिय वस्तू प्राप्त झाल्याने त्याला आनंद होत नाही तसेच अप्रिय वस्तू प्राप्त झाल्याने दुःखही होत नाही.'' ।।२०।।

''अशा ज्ञानी पुरुषाचे अंतःकरण बाहेरील विषयात मुळीच गुंतत नाही. अंतःकरणातल्या आत्मलाभाचा आनंद त्याला मिळतो. आणि परमात्मस्वरूपात मिळून तेथे तो युक्त झाला की अखंड आनंदाचाच अनुभव घेतो.'' ।।२१।।

(१८ व १९) पहिले दोन श्लोक हे सातव्या श्लोकावरील भाष्य आहेत. विशुद्धात्मा व विजितात्मा कसा असतो याचे हे वर्णन आहे. शुद्ध अंतःकरणाचा हा पुरुष ज्ञानाने आपली सर्व किल्मिषे, मळ धुवून काढतो. जगाकडे समदृष्टीने पाहत ''आपणचि विश्व जाहला'' याचा अनुभव घेतो. सगळीकडे एकच आत्मतत्त्व भरून राहिले आहे याची प्रचीती त्याला येते. सुखदुःखात बुद्धी समतोल झाल्यामुळे आनंदाने हुरळून जात नाही व दुःखाने होरपळून जात नाही. जितेंद्रिय झाल्यामुळे विषयात असूनसुद्धा बुद्धी अविचल राहते. अंतःसुखाची प्राप्ती होऊन तो सदैव प्रसन्नचित्त राहतो. सर्व करतो पण कोणतेही कर्म त्याला चिकटत नाही. इंद्रिये, मन, बुद्धी ही भगवंताच्या चरणी अर्पण करून अहंकाररहित व वासनारहित होतो. कोणताही संशय मनात नसल्याने, निवांत राहून भगवंताशी जोडला जातो.

सुख! सुखाची व्याख्या!! सुखी होण्याचा मंत्र!!!

मानवी जीवनातील सर्वांत जिव्हाळ्याच्या प्रश्नावर हे प्रतिपादन केले आहे. मनुष्य जन्मल्यापासून सुखासाठी यातायात करत असतो. आपल्या प्रत्येक संकल्पाचे, कृतीचे, विचारांचे फळ सुखमय व्हावे हीच प्रत्येकाची इच्छा असते. सत्ता, संपत्ती, कीर्ती, प्रपंच, स्त्री-पुत्रादिक, गाडी, बंगला... सर्व, सर्व काही आपल्याला सुखासाठी पाहिजे असते. आज सुख मिळेल, उद्या सुख मिळेल, ह्या आशेवर वस्तूंची गोळाबेरीज करत असताना जीवनाचा संध्यासमय केव्हा समीप

येऊन ठेपलाय हेही आपल्याला कळत नाही. अखेरच्या श्वासापर्यंत सुखाचा हव्यास काही सुटत नाही. पण ज्यात सुख शोधण्यासाठी धडपडतो तो तर सुखाचा केवळ आभास होता, ह्याचे जेव्हा आकलन होते त्या वेळी शरीराची गात्रे शिथिल झालेली असतात. काही करण्याची उमेद, शक्ती देहात राहिलेली नसते. म्हणून वेळीच माणसाला जर सुखाचा अर्थ समजला तर हे जीवन निरर्थक ठरणार नाही, आपल्याला याचा बोध भगवंतांनी पुढील श्लोकांतून करून दिला आहे. हे श्लोक केवळ चिंतनीय नसून अनुकरणीय आहेत.

**ये हि संस्पर्शजा भोगा दुःखयोनय एव ते ।**
**आद्यन्तवन्तः कौन्तेय न तेषु रमते बुधः ।।२२।।**
**शक्नोतीहैव यः सोढुं प्राक् शरीरविमोक्षणात् ।**
**कामक्रोधोद्भवं वेगं स युक्तः स सुखी नरः ।।२३।।**

''(इंद्रियांशी होणाऱ्या बाह्य पदार्थांच्या) संयोगामुळेच उत्पन्न होणारे जे भोग त्यास आदि, अंत असल्यामुळे ते दुःखाचेच कारण होत. म्हणून त्यांचे ठायी शहाणा पुरुष, हे कौन्तेया! बिलकुल रममाण होत नाही.'' ।।२२।।

''शरीर सुटण्यापूर्वी अर्थात् आमरणान्त कामक्रोधामुळे होणारा वेग इहलोकीच सहन करण्यास जो समर्थ होतो, तोच मुक्त व तोच (खरा) सुखी पुरुष होय.''।।२३।।

दुसऱ्या अध्यायातसुद्धा भगवंतांनी त्याची पूर्वप्रस्तावना केली आहे.

**मात्रास्पर्शास्तु कौन्तेय शीतोष्णसुखदुःखदाः ।**
**आगमापायिनोऽनित्यास्तांस्तितिक्षस्व भारत ।।२.१४।।**

''हे कुंतिपुत्रा! शीतोष्ण किंवा सुखदुःख देणारे जे हे मात्रांचे म्हणजे बाह्यसृष्टीतील पदार्थांचे (इंद्रियांशी) संयोग त्यांना आरंभ व नाश आहेत (म्हणून) ते अनित्य म्हणजे विनाशी होत. हे भारता! (दुःख न करता) ते तू सहन कर.''

जर समजून भोग घेतले नाहीत तर विषय हे विषासारखे आहेत ''धर्माविरुद्धो भूतेषु कामोऽस्मि भरतर्षभ'' जो काम (इच्छा, वासना, भोग) धर्माला अनुसरून आहे, ती भगवंताचीच विभूती आहे, हे सातव्या अध्यायात भगवंतांनी स्पष्ट केले आहे. त्यामुळे विषय सोडून पूर्ण वैराग्य अंगी बाणवा असा उपदेश गीता करीत नाही. विषय नसतील तर मानवी जीवन बेचव होऊन जाईल. रस घेऊन जगण्यासारखे जीवनात काहीच राहणार नाही. म्हणून ईश्वरानेच ही विषयरूपी खेळणी मानवाला दिली आहेत. लहान मूल रडायला लागले की आई खेळणी देते. मूल तेवढ्यापुरते गप्प बसते व पुन्हा आईकडे येते. पण मनुष्य मात्र या विषयरूपी खेळण्यात एवढा रमून जातो की, ईश्वररूपी आईलाच तो विसरून जातो. या विषयांच्या खेळण्यांची तऱ्हाही चमत्कारिकच! मृगजळासारख्या



विषयांपासून तृष्णाही तृप्त होत नाही. भोग घेऊ नका असे नव्हे तर ''संयमित भोग'' ही गीतेची शिकवण आहे. धन कमवू नका, वस्तूंची आसक्ती ठेवू नका असे आपले तत्त्वज्ञान सांगत नाही. गीता तरी नाहीच नाही. पण ''उत्तम व्यवहारे'' धन मिळवावे हे मात्र नक्की.

२२ व्या श्लोकावर ज्ञानेश्वर माऊलींनी खरमरीत शब्दांत या ''विषयांची'' चिरफाड केली आहे. विषयांचे स्वरूप समर्पक दृष्टान्ताद्वारे समजाविले आहे. ते म्हणतात -

**एऱ्हवी विषयीं काइ सुख आहे ।**
**हे बोलणेंचि सारिखे नोहे ।**
**तरी विद्युत्स्फुरणे कां न पाहे । जगामाजी ।।११३।।**
**हे असो आघवी बोली । सांग पां सर्पफणीची साउली ।**
**ते शीतल होईल केतुली। मूषकासी ।।११७।।**
**जैसा आमिषकवळु पांडवा । मीनु न सेवि तवचि बरवा ।**
**तैसा विषयसंगु आघवा । निभ्रांत जाणे ।।११८।।**
**म्हणोनि विषयभोगीं जे सुख । ते साद्यन्तचि जाण दुःख ।**
**परि काय करिती मूर्ख । न सेवितां न सरे ।।१२०।।**
**ते अंतर नेणती बापुडे । म्हणौनि अगत्य सेवणे घडे ।**
**सांग पूयपंकीचे किडे । काय चिळसी घेती ।।१२१।।**

''एऱ्हवी विषयांमध्ये काही सुख आहे हे म्हणणे बोलण्याच्या सुद्धा योग्यतेचे नाही. नाहीतर विजेच्या चमकण्याने जगामध्ये का उजाडत नाही? हे सर्व प्रतिपादन राहू दे. तूच सांग, सर्पाच्या फणीची सावली आहे, ती उंदराला कितपत शांत करणारी होईल बरे? अर्जुना, ज्याप्रमाणे गळाला लावलेल्या आमिषाचा पिंड जेथपर्यंत मासा गिळीत नाही, तेथपर्यंतच ठीक. त्याप्रमाणे विषयाच्या संगाची स्थिती आहे, हे तू निःसंशय समज! म्हणून विषयांच्या उपभोगामध्ये जे सुख असते ते प्रारंभापासून शेवटपर्यंत दुःखच आहे, हे समज. परंतु काय करतील मूर्ख? विषयांचे सेवन केल्याशिवाय त्यांचे चालतच नाही. ते बिचारे मूर्ख त्या विषयांचे आतले स्वरूप जाणत नाहीत, म्हणून त्यांच्याकडून विषयाचे अगत्य सेवन होते. तूच सांग, पुवाच्या चिखलातील किडे पुवाची किळस घेतात काय?''

आणि अधिक समर्पक शब्द ह्याहून असतील का? विषय असंख्य आहेत. एका भोगात दुसऱ्या भोगाची इच्छा निर्माण होते. एक इच्छा पूर्ण झाली की पूर्ण झालेल्या इच्छेतच दुसऱ्या इच्छेचा जन्म होतो. ''न जातु कामः कामानां उपभोगेन शाम्यति ।'' विषय भोगण्याने विषयांची तृप्ती होत नाही. अग्नीत जसे तूप ओतावे व अग्नी अधिक भडकावा तसा हा काम अधिकच वाढत जातो. या विषयांच्या भोगाविषयी भर्तृहरी म्हणतो,

**भोगा न भुक्ता वयमेव भुक्ताः**
**कालो न यातो वयमेव याताः ।**
**तपो न तप्तं वयमेव तप्ताः**
**तृष्णा न जीर्णा वयमेव जीर्णाः ।**

आपण भोग भोगत नसतो, आपणच भोगले जात असतो. काळ सरत नाही. आपणच जात असतो. तप तापत नाही, आपणच तप्त होतो. तसेच तृष्णा जीर्ण होत नाही, आपणच जीर्ण होत असतो.

सुख कोणास नको असते? प्रत्येक कर्म सुखासाठीच असते. ही सर्व कर्मे इंद्रियांच्या स्वाभाविक वृत्तीस अनुकूल असतील तर सुख देतात, प्रतिकूल असतील तर दुःख देतात. ''अनुकूलतया वेदनीयं सुखं व प्रतिकूलतया वेदनीयं दुःखं'' ही अशीच एक सुखाची-दुःखाची व्याख्या आहे. पण अपुरी!

सुखाचा किंवा दुःखाचा अनुभव शेवटी मनावरच अवलंबून असतो. केवळ दुःखाचे निवारण किंवा कामाची तृप्ती म्हणजे सुख मानणे सर्वस्वी गैर आहे. सुख ही स्वतंत्र वस्तू नाही. बाह्य पदार्थांचा इंद्रियांशी स्पर्श म्हणजे संयोग झाला असता सुख किंवा दुःख या वेदना उत्पन्न होतात. हाच कर्मयोगशास्त्राचा सिद्धान्त आहे. कानांना मधुर संगीत सुखावह वाटते, पण कर्कश आवाज पीडादायक वाटतो. बासुंदीचे सेवन जिव्हेला गोड वाटते, तर पौर्णिमेचे चांदणे डोळ्याला आनंददायक वाटते. अशा प्रकारचे इंद्रियजन्य सुख त्या वेळेपुरती तृप्ती करणारे असते. पण अशा इंद्रियजन्य सुखात त्याचा आरंभही असतो नि शेवटही. ययाती राजाचे उदाहरण यासाठी उत्तम आहे. शुक्राचार्यांच्या शापाने तो म्हातारा झाला, तेव्हा त्याने तारुण्यासाठी पुन्हा याचना केली. शुक्राचार्यांनी त्याला उःशाप दिला, ''तू आपले वार्धक्य दुसऱ्याला देऊन त्याचे तारुण्य घेऊ शकतोस व पुन्हा विषयभोग घेऊ शकतोस.'' ययातीचा पुत्र पुरू. त्याने आपले तारुण्य ययातीला दिले व ययातीने एक हजार वर्षे विषयसुखांचा उपभोग घेतला. शेवटी त्याला कळले की, सुखांच्या उपभोगाने सुखाची इच्छा तृप्त होत नाही. सुखाची इच्छा ही सुखाच्या उपभोगापेक्षा नेहमीच पुढे धावत असते. म्हणून अशा सुखाला आरंभ व शेवट आहे. त्यामुळे शेवटी ते दुःखासच कारण होतात. त्यामुळे अशी अनित्य, क्षणभंगुर सुखात शहाणी माणसे रमत नाहीत, हा २२ व्या श्लोकाचा अर्थ आहे.

आध्यात्मिक सुख हेच सर्वश्रेष्ठ यात संदेह नाही. आत्मसुख हेच खरे सुख. ''सुखाचे हे सुख श्रीहरीचे मुख'' हेच संतांचे वारंवार सांगणे आहे. श्रीहरीचे मुख हेच आत्मस्वरूप. आपला 'स्व' भाव हा नित्य आनंदमयच आहे. आत्म्याचे स्वरूप सच्चिदानंदमय आहे. म्हणून सुखाची 'कस्तुरी' ही आपल्या



आतच असूनदेखील त्या सुवासाचा शोध घेत तडफडणाऱ्या हरिणासारखी आपली गत झाली आहे. विषयोपभोगाच्या आधिभौतिक सुखास 'प्रेय' म्हणतात, तर आत्मबुद्धीच्या प्रसन्नतेपासून मिळणाऱ्या आध्यात्मिक सुखास 'श्रेय' म्हणतात. हा अक्षय आनंद आहे. आत्मसुखाची तृप्ती अखंड, अवीट असते व हे सुख बाह्यवस्तूंची अपेक्षा न ठेवता केवळ मनाच्या व बुद्धीच्या उदात्त व्यापारात व शुद्धावस्थेतच मनुष्यास प्राप्त होऊ शकते.

म्हणून २३ व्या श्लोकात अशा सुखी माणसाची यथार्थ व्याख्या केली आहे. ज्याचे मन काम-क्रोधाचे आवेग सहन करू शकते, इंद्रियमनाने ज्याची बुद्धी स्थिर व मन शांत राहते, तो सुखी पुरुष होय. फलाशा सोडून सर्व कर्मे कृष्णार्पण बुद्धीने करीत असा सुखी पुरुष ब्रह्मपदापर्यंत पोहोचू शकतो. केवळ विषयोपभोगसुख कधीही पुरे न होणारे, अनित्य व पशुधर्माकडे नेणारे आहे. आत्मबुद्धिप्रसादापासून प्राप्त होणारे अक्षय शांतिसुख हेच मनुष्याचे खरे ध्येय असले पाहिजे.

सुख-दुःखाच्या या व्यापक, सर्वस्पर्शी विषयावर गीतेत वारंवार उल्लेख आलेले आहेत. त्या त्या अध्यायाच्या चर्चेच्या वेळी या विषयावर आपण विचारमंथन करणार आहोत. इथे चर्चा आहे, ती पाचव्या अध्यायातील श्लोकांच्या अनुरोधानेच. ह्या दृष्टीने २४ वा श्लोकदेखील महत्त्वाचा आहे. तो असा,

**योऽन्तः सुखोऽन्तरारामस्तथान्तर्ज्योतिरेव यः ।**
**स योगी ब्रह्मनिर्वाणं ब्रह्मभूतोऽधिगच्छति ।।२४।।**

''याप्रमाणे (बाह्य सुख-दुःखाची अपेक्षा न ठेवता) जो अंतःसुखी म्हणजे अंतःकरणात सुखी झाला, जो अंतरातच आराम पावू लागला आणि तसेच ज्याला (हा) अंतःप्रकाश मिळाला तो योगी ब्रह्मरूप होऊन त्यालाच ब्रह्मनिर्वाण म्हणजे ब्रह्मात मिळून जाण्याचा मोक्ष प्राप्त होतो.'' ।।२४।।

''एकदा आत्मलाभाचा, अंतःसुखाचा स्पर्श जरी झाला तरी बाहेरच्या भोग्य विषयातील गोडी, रुची वाटेनाशी होते. इंद्रियांची सुखलोलुपता व बहिर्मुखता क्षीण होते. मन, बुद्धी शुद्ध होऊन विषय-विकारांचे उदात्तीकरण व विभूतिकरण होते. देहात्मक बुद्धी जाऊन अंतरात्म्यात सुखाची अनुभूती प्राप्त होते. संत तुकारामांच्या शब्दांत,

**''भक्त ऐसे जाण जे देही उदास**
**गेले आशापाश निवारुनी**
**विषय तो त्यांचा झाला नारायण ।''**

जरी ते विषय भोगत असले, कर्म करीत असले तरी त्यात त्यांची बुद्धी लिप्त झालेली नसते. 'मी' करतो असा अहंभाव, कर्तृत्वाभिमान नसतो. सर्व

कर्मे ईश्वरार्पण बुद्धीने केलेली असल्यामुळे त्यांना दिव्यत्वाचा स्पर्श होतो. असे महात्मे तुमच्या-आमच्यातच वावरत असतात, सर्व लौकिक व्यवहार सर्वसामान्यांसारखेच होत असतात. पण अंतःकरणात मात्र ते पूर्णपणे वेगळे असतात. आतून तृप्त असतात. समत्वबुद्धीने जगाकडे पाहत असतात. "आपणचि विश्व जाहला । तरी भेदभावो सहजचि गेला । म्हणोनि द्वेषु ठेला । जया पुरुषा ।।" अशी जगाकडे पाहण्याची दृष्टी होते. आत्मरत असल्यामुळे आत्मौपम्य दृष्टीने सर्वभूतमात्राकडे पाहत असतात. करुणा, दया, प्रेम, अशा दैवी गुणांचा उत्कर्ष त्यांच्या शुद्ध अंतःकरणात झाल्यामुळे ते अक्षय सुखाचे धनी झालेले असतात.

शेवटी सुखाचा, आनंदाचा झरा आपल्या अंतःकरणातच स्रवत असतो. आपले 'स्व' स्वरूप हे स्वभावतः आनंदस्वरूपच असल्यामुळे सुखाचे प्रकटीकरण आधी आतच व्हावे लागते. भगवान आदिशंकराचार्यांनी आपल्या 'निर्वाण-षटकात' ह्या आंतरिक स्थितीचे अतिशय माधुर्यमय वर्णन केले आहे. मन, बुद्धी, अहंकार, चित्त, पंचमहाभूते, पंचवायू, पंचकोश, द्वेष, राग, लोभ, मोह, चारी पुरुषार्थ, पाप-पुण्य, सुख-दुःख, भोक्ता, भोज्य, भोजन, पिता, माता, पुत्र, बंधु, गुरु-शिष्य... असा कोणीही 'मी' नाही. मग माझे मूळ स्वरूप तरी कोणते? ते म्हणतात-

**अहं निर्विकल्पो निराकाररूपो**
**विभुर्व्याप्य सर्वत्र सर्वेन्द्रियाणाम् ।**
**सदा मे समत्वं न मुक्तिर्न बन्धः**
**चिदानंदरूपः शिवोऽहम् शिवोऽहम् ।।६।।**

- "मी निर्विकल्प म्हणजे भेदातीत आहे, निराकार आहे. मी सर्व इंद्रियांना व्यापून राहिलो आहे. मी 'विभू' म्हणजे संपूर्ण विश्वाला व्यापून राहणारा आहे. मी सदासर्वकाळ समरूप म्हणजे एकरूप आहे. मला मुक्ती नाही तसेच संसाराचे बंधनही नाही. मी शिव म्हणजे मंगलमय चिदानन्दरूप (शिवस्वरुप) आहे."

अशी अनुभूती त्या साधकाला येत असल्यामुळे, तो दैवी सुखाचा अंतरात्म्यात आनंद उपभोगत असतो. हा अंतःप्रकाश मिळाल्यामुळे तो ब्रह्मस्वरूप होऊन मोक्ष प्राप्त करून घेतो. त्याचे सर्व अंतरंगच शुद्ध, जाणिवेच्या प्रकाशात भरून गेलेले असते. अशीच व्यक्ती या नित्यतत्त्वाच्या साक्षात्कारात ब्रह्मानंदाचा अनुभव घेत असते. अशांचे पाप ज्ञानाने निःशेष धुऊन गेल्यामुळे ते पुन्हा जन्मास येत नाहीत, मन साम्यावस्थेत स्थिर झाल्यामुळे, समत्वबुद्धीमुळे त्यांनी इथेच मृत्यूला जिंकलेले असते. असेच पुरुष ब्रह्मभूत झालेले असतात. असा ह्या २४ व्या श्लोकाचा अन्वयार्थ.



२५, २६ या दोन श्लोकांत अशा ब्रह्मीभूत पुरुषाचेच वर्णन आहे. हा संपूर्ण पाचवा अध्याय म्हणजे 'योगयुक्तो विशुद्धात्मा...: कुर्वन्नपि न लिप्यते" - ह्या सारभूत असलेल्या सातव्या श्लोकावरील भाष्य' आहे. सूत्र, सिद्धान्त व फळ ह्या रूपाने ह्या एका श्लोकात ब्रह्मीभूत पुरुषाचे वर्णन सामावले आहे. सांख्यमार्गाने जो मोक्ष मिळतो तोच कर्मयोगाने म्हणजे कर्मे न सोडता कसा मिळतो त्याचे सविस्तर निरूपण ह्या सर्व वरील श्लोकांत झाले आहे.

श्लोक २७ व २८ ह्यांमध्ये भगवंतांनी पुढील सहाव्या अध्यायातील वर्णिलेल्या 'आत्मसंयम योगा'चे सूतोवाच सारांशरूपाने केले आहे. हे दोन सूत्रात्मक श्लोक असे,

**स्पर्शान्कृत्वा बहिर्बाह्यांश्चक्षुश्चैवान्तरे भ्रुवोः ।**
**प्राणापानौ समौ कृत्वा नासाभ्यन्तरचारिणौ ।।२७।।**
**यतेन्द्रियमनोबुद्धिर्मुनिर्मोक्षपरायणः ।**
**विगतेच्छाभयक्रोधो यः सदा मुक्त एव सः ।।२८।।**

"(इंद्रियांचे) बाह्य पदार्थांशी (सुखदुःख देणारे) संयोग बाहेरच्या बाहेर ठेवून, दृष्टी दोन भुवयांच्या मध्ये राखून आणि नाकातून वाहणारे प्राण आणि अपान सम करून, इंद्रिये, मन व बुद्धी यांचे ज्याने संयमन केले, आणि इच्छा, भय व क्रोध ही ज्याला सुटली, तो मोक्ष-परायण मुनी सदा-सर्वदा मुक्तच म्हणावयाचा."

इंद्रियनिग्रह कसा करावा व ज्ञानविज्ञान म्हणजे काय ह्याचे स्पष्टीकरण करण्यासाठी ह्या दोन श्लोकांत त्या विषयाची पूर्वमांडणी केली आहे. तिसऱ्या अध्यायात ह्या काम-क्रोधरूपी राक्षसाचे वर्णन आले आहे. हे शत्रू मनुष्याची मन, बुद्धी, इंद्रिये ह्यात वास्तव्य करून ज्ञानविज्ञानाचा नाश करतात (श्लोक ४०-अध्याय ३). म्हणून इंद्रियनिग्रहाने ह्यांचा तू नाश कर असे भगवंतांनी अर्जुनाला सांगितले. हाच पूर्वविषय सहाव्या अध्यायात सविस्तर येणार आहे.

ह्या ईश्वरप्रणीत योगमार्गाचे स्थूलस्वरूपाचे वर्णन वरील दोन श्लोकांत आहे. शेवटच्या २९ व्या श्लोकांत भगवंत "ते यज्ञ व तप यांचा भोक्ता आहेत" असे म्हटले आहे. १५ व्या श्लोकात परमात्मा कोणत्याही जीवाच्या पाप-पुण्याचे ग्रहण करत नाही हे आधीच सांगितले आहे. असा परस्परविरोधाभास दाखविणारा असा हा श्लोक आहे.

**भोक्तारं यज्ञतपसां सर्वलोकमहेश्वरम् ।**
**सुहृदं सर्वभूतानां ज्ञात्वा मां शान्तिमृच्छति ।।२९।।**

"(सर्व) यज्ञ व तप यांचा भोक्ता, (स्वर्गादि) सर्व लोकांचा मोठा धनी आणि अवघ्या भूतांचा मित्र, असा जो मी, त्या मला (याप्रमाणे) ओळखणारा शान्ती पावतो."

त्यामुळे कर्मसिद्धान्तातील महत्त्वाचा फरक समजून घेणे आवश्यक आहे. जे कर्म सकाम, अहंकारयुक्त आहे ते जीवात्म्याच्या अहंपर्यंतच राहते व तिथेच थांबते, पण जे कर्म निष्काम, निरहंकारी वृत्तीने केलेले असेल व ज्यात बुद्धी लिप्त झालेली नाही, असे ब्रह्मार्पण वृत्तीने केलेले कर्म जीवात्म्याच्या अहंपर्यंत न राहता ईश्वरापर्यंत येऊन पोहोचते. म्हणून ईश्वर 'भोक्तारं' आहे. ते सर्व जगाचे अधिपती आहेत, नियंता आहेत, देवांचे देव आहेत. त्यांनी रचलेल्या दिव्य नियमानुसारच हे जग चालत आहे.

ईश्वराच्या स्वरूपासंबंधीचे असेच वर्णन उपनिषदामध्ये आले आहे -

**भयादस्याग्निस्तपति भयात् तपति सूर्यः ।**
**भयादिन्द्रश्च वायुश्च मृत्युर्धावति पञ्चमः ।।** (कठ.उप. २.३.३)

''त्यांच्याच भयाने अग्नी तापतो, त्यांच्याच भयाने सूर्य तापतो, त्यांच्याच भयाने इन्द्र, वायू आणि मृत्यू इ. देव आपल्या आपल्या कार्यासाठी धावत आहेत.''

**एको हि रुद्रो न द्वितीयाय तस्थुर्य इमाँल्लोकानीशत**
**ईशनीभिः । प्रत्यङ् जनांस्तिष्ठति...** (श्वे.उप. ३.३.२)

''ते एकटेच आहेत. दुसऱ्या कोणाचाच त्यांनी आश्रय घेतलेला नाही. ते आपल्या अंतर्भूत शक्तीच्या द्वारे सर्व लोकांवर शासन करतात. असा हा परमात्मा सर्व जीवांमध्ये स्थित आहे.''

ते सर्व प्राण्यांचे मित्र आहेत. तेच त्यांचे शक्तिदाता आहेत, आनंददाता आहेत; तेच त्यांचे उद्धारकर्ताही आहेत. जो मनुष्य भक्तियुक्त हृदयाने त्यांच्याठायी मन ठेवतो, त्यांच्याठायी बुद्धी स्थिर करतो, तो कृतार्थ होतो...

कर्मयोगसिद्धान्तावरील 'संन्यासयोग' नावाचा पाचवा अध्याय इथे संपतो.

**।। श्रीकृष्णार्पणमस्तु ।।**



# अध्याय सहावा
# आत्मसंयमयोग

आता सहावा अध्याय! आत्मसंयमयोग किंवा ध्यानयोग. अत्यंत महत्त्वाचे विषय असलेला पण थोडा क्लिष्ट! योगारूढ पुरुषाची लक्षणे, ध्यानयोगाची साधने व त्याचा अभ्यास, चंचल मनाची स्थिती, सर्वत्र आत्मदर्शन किंवा आत्मौपम्य दृष्टीने पाहण्याची वृत्ती, योगभ्रष्ट पुरुषाची गती. योग्याचा महिमा अशा महत्त्वपूर्ण विषयांचे मार्गदर्शन करणारा ४७ श्लोकांचा हा अध्याय आहे.

ह्या अध्यायाची पूर्वसूचना, सूतोवाच भगवंतांनी तिसऱ्या अध्यायातच केली आहे. मनुष्य इच्छा नसतानासुद्धा पाप करण्यास का प्रवृत्त होतो? ह्या ३६ व्या श्लोकांतील अर्जुनाच्या प्रश्नावर भगवंतांनी उत्तर दिले, ''काम व क्रोध हेच माणसाचे खरे शत्रू आहेत. हे शत्रू मनुष्याची इंद्रिये, मन, बुद्धी ह्यांत निवास करून त्याच्या ज्ञान-विज्ञानाचा, विवेकबुद्धीचा नाश करतात. म्हणून इंद्रियनिग्रहाने ह्या कामरूपी शत्रूंना मारून टाक. स्थिर बुद्धीने आत्म्याला जाणून दिव्य स्थिती प्राप्त करून घे,'' असा उपदेश भगवंतांनी तिसऱ्या अध्यायात (३७ ते ४३ ह्या श्लोकांत) अर्जुनाला केला.

पण हा इंद्रियनिग्रह कसा करावा व त्याची साधने कोणती ह्या विषयासंबंधी काहीही ऊहापोह झाला नाही. कारण चौथ्या व पाचव्या अध्यायात अर्जुनांनी केवळ कर्मयोगासंबंधीच प्रश्न विचारले. कर्मसंन्यास व कर्मयोग या दोहोंत श्रेष्ठ मार्ग कोणता यासंबंधीचे संपूर्ण विश्लेषण करून त्यांची एकवाक्यताही भगवंतांनी या दोन्ही अध्यायात करून दिली. ब्रह्मनिर्वाणरूपी मोक्ष कसा प्राप्त होतो त्याचे प्रतिपादनही केले. पण ही स्थिती ज्या साधनांनी होते ते सांगावयाचे राहूनच गेले. तिसऱ्या अध्यायात केवळ बीजरूपाने इंद्रियनिग्रहाचा विषय पेरला, पण आता सहाव्या अध्यायात मात्र हा विषय पूर्णपणे फळरूपास आला आहे.

तरीही अध्यायाच्या सुरुवातीच्या दोन श्लोकांमध्ये कर्मसंन्यासाचा मागील विषय पुन्हा एकवार प्रतिपादिला आहे. ते श्लोक असे -

**अनाश्रितः कर्मफलं कार्यं कर्म करोति यः ।**
**स संन्यासी च योगी च न निरग्निर्न चाक्रियः ।।१।।**
**यं संन्यासमिति प्राहुर्योगं तं विद्धि पांडव ।**
**न ह्यसंन्यस्तसंकल्पो योगी भवति कश्चन ।।२।।**

श्रीकृष्ण भगवान म्हणतात,

“कर्मफलाची इच्छा न धरता जो शास्त्राप्रमाणे आपले विहित, कर्तव्यकर्म करितो तोच संन्यासी व तोच कर्मयोगी म्हणावयाचा. 'निरग्नि' म्हणजे अग्नीचा त्याग करणारा (अग्निहोत्रादिक कर्मे सोडून देणारा) किंवा 'अक्रिय' म्हणजेच कोणतेच कर्म न करता स्वस्थ बसणारा हा खरा संन्यासी किंवा खरा योगी नव्हे.” ।।१।।

“हे अर्जुना! ज्याला संन्यास असे म्हणतात तोच कर्मयोग समज, कारण संकल्पाचा म्हणजे काम्यबुद्धिरूप फलाशेचा संन्यास (त्याग) केल्याखेरीज कोणीही (कर्म) योगी होत नाही.” ।।२।।

ज्ञानेश्वर माऊली पहिल्या श्लोकावरील निरूपणात एकाच ओवीमध्ये योग्याची व्याख्या अशी करतात -

**आइके सकल संमतें जगीं । अर्जुना गा तोचि योगी ।**
**जो कर्म करूनी रागी । नोहेचि फळीं ।।४३।।**

“अर्जुना, ऐक, जो कर्माचे आचरण करून त्याच्या फलाविषयी आसक्त होत नाही, तोच ह्या जगामध्ये सर्वांना मान्य असलेला योगी होय.”

दुसऱ्या श्लोकानुसार संकल्प त्यागामुळेच संन्यास होतो. काम्यबुद्धीचा किंवा फलाशेचा त्याग करणे हाच खरा संन्यास होय. खरे म्हणजे संन्यास बाह्य आचरणांवर ठरवायचा नसून बुद्धीतील निष्काम भावावरच त्याची सिद्धता होते. हीच गोष्ट पुन्हा एकदा १८ व्या अध्यायात अर्जुनाच्या 'संन्यास व त्याग' ह्या संबंधी विचारलेल्या प्रश्नावर भगवंतांनी विशद करून सांगितली. ते म्हणतात,

**काम्यानां कर्मणां न्यासं संन्यासं कवयो विदुः ।**
**सर्वकर्मफलत्यागं प्राहुस्त्यागं विचक्षणाः ।।१८.२।।**

“काम्य (म्हणजे फलाची आशा धरून केलेली) कर्मांचा न्यास (म्हणजे त्याग) यालाच शहाणे लोक 'संन्यास' असे समजतात व सर्व कर्माच्या फलांचा त्याग करणे याला पंडित 'त्याग' असे म्हणतात.”

कर्मयोगमार्गात संन्यास व त्याग कशाला म्हणावयाचे हे या श्लोकात स्पष्ट केले आहे. हीच गोष्ट सहाव्या अध्यायाच्या वरील दोन श्लोकांत आली आहे. निरहंकारी बुद्धीने फलाशा सोडून जो कर्माचरण करतो तोच संन्यासी, तोच योगी. दोघांचीही कृती एकच होय. दोन्ही फलाशेचा त्याग करतात. संन्याशाची भूमिका थोडी निराळी दिसते. कारण तो फलाशा धरून जे कर्म केले जाते त्या कर्माचा त्याग करतो, पण योगी कोणतेही कर्म करताना फलाशा धरतच नाही. दोन्ही भूमिका एकच, कारण दोन्ही त्याग वास्तविक फलाशेचे आहेत.

योगमार्गात चालणारा साधक योगारूढ झाल्यास त्याची साधना पूर्णावस्थेत पोचते. योगारूढ झाल्यास मनात 'शम' म्हणजे शांती येते. जो मुनी (मनन करणारा साधक) योगारूढ होऊ इच्छितो आणि जो योगारूढ झाला आहे, या



दोन्ही स्थितीत फरक काय? या प्रश्नाचे उत्तर या अध्यायाच्या पुढील दोन श्लोकांत आहे -

**आरुरुक्षोर्मुनेर्योगं कर्म कारणमुच्यते ।**
**योगारूढस्य तस्यैव शमः कारणमुच्यते ।।३।।**
**यदा हि नेन्द्रियार्थेषु न कर्मस्वनुषज्जते ।**
**सर्वसंकल्पसंन्यासी योगारूढस्तदोच्यते ।।४।।**

'आरुरुक्षू' म्हणजे योगारूढ होऊ इच्छितो त्या मुनीस निष्काम भावाने केलेली कर्मे हे शमाचे (मनाच्या शांतीचे) कारण म्हणजे साधन म्हटले जाते आणि तोच पुरुष योगारूढ म्हणजे पूर्ण योगी झाला म्हणजे त्याच्या मनातील हा शम (शांती) हे त्याने पुढे लोकसंग्रहार्थ केलेल्या निष्काम कर्माचे कारण होते.” ।।३।।

“जेव्हा एखादा साधक इंद्रियांच्या (शब्दस्पर्शादि) विषयांच्या ठायी किंवा कर्माच्या ठायी अनुषक्त होत नसतो, आणि सर्वसंकल्पांचा म्हणजे कामबुद्धिरूप फलाशेचा (कर्माचा नव्हे) संन्यास (त्याग) करतो तेव्हा त्याला 'योगारूढ' म्हणतात.” ।।४।।

योगाभ्यास करणाऱ्या ज्या पुरुषाचे वर्णन या श्लोकाच्या पूर्वार्धात केले आहे त्याचीच पुढे म्हणजे योगाभ्यास पूर्ण झाल्यावर काय स्थिती होते ती सांगण्यासाठी उत्तरार्धाचा आरंभ झाला आहे. 'कर्म' व 'शम' यांचे संदर्भ सिद्धावस्थेत बदलतात. पहिल्या पंक्तीत 'योगारूढ होऊ इच्छितो अशा साधकाचे (आरुरुक्षूचे) निष्काम कर्म हे शमाचे कारण होते' हे सांगितल्यावर दुसऱ्या पंक्तीत 'योगारूढाचे शम हे निष्काम कर्माचे कारण होते' हे सांगितले आहे.

या दोन श्लोकांमध्ये भगवंतांनी आरुरुक्षू व योगारूढ यांच्यामधील भेद स्पष्ट केला आहे. हेतू म्हणजे संकल्प व फलाशा. जोपर्यंत हे दोन्ही सुटत नाहीत तोपर्यंत कर्म चिकटणारच. पण योगारूढाची फलाशा व संकल्प दोन्ही नाहीशी झाल्यामुळे त्याने केलेले कर्म त्याला चिकटत नाही. योगारूढाचे संकल्प हे जणू भगवंताचेच संकल्प असतात. त्याचे शरीर केवळ निमित्तमात्र असते. संकल्प-विकल्पाशिवाय मन राहू शकत नाही. संकल्प आहेत म्हणून कृति-कर्म आहे. महात्म्याचेही संकल्प असतात पण ते त्याचे नसतात. भगवंतच अशा दिव्य विभूतींमध्ये स्वतःचे संकल्प घालून कर्म करवून घेत असतो. म्हणून त्याचे कर्म हे भगवंताचे कर्म होऊन जाते. पण ही अवस्था येण्यासाठी चौथ्या श्लोकात सांगितलेल्या तीन अवस्था प्राप्त होणे अनिवार्य आहे. हीच सिद्धावस्थेतील योगारूढ पुरुषाची लक्षणे : विषयविमुखता (नेंद्रियार्थेषु), कर्मपराङ्मुखता (म्हणजे अलिप्तता) (कर्मस्वनुषज्यते) व संकल्पशून्यता (सर्वसंकल्पसंन्यासी) ही उत्तरोत्तर उन्नतीकडे नेणारी अवस्था. पाचव्या अध्यायातील योगयुक्त, विशुद्धात्मा,

विजितात्मा, जितेन्द्रियाचे जे वर्णन तेच सहाव्या अध्यायातील योगारूढ पुरुषाचे वर्णन. या अध्यायात हे प्राप्त करण्याचा साधनमार्ग मात्र सांगितला आहे.

सहाव्या अध्यायात भगवंतांनी एक मौलिक सिद्धांत कथन केला आहे. प्रयत्नवाद हा गीतेचा संदेश आहे. 'नर करणी करे तो नरका नारायण हो जाये', हा जीवनमंत्र पाचव्या व सहाव्या श्लोकांत सांगितला आहे. हतबल, गर्भगळित, दिशाहीन झालेल्या आजच्या माणसाला गीता संजीवनी देत आहे. प्रारब्ध-क्रियमाण ह्या विषयाच्या संदर्भात ह्यातील पाचवा श्लोक पूर्वीच आपण चर्चिला आहे. गीता माणसाला दैववादी हो म्हणून सांगत नाही. दैवाला पाचवे स्थान गीतेने दिले आहे. यादृष्टीने हे दोन्ही श्लोक अमृततुल्य आहेत. आजच्या या करालयुगात पुरुषार्थहीन झालेल्या माणसाला उभा करणारा हा मंत्र आहे. हे दोन्ही श्लोक असे,

**उद्धरेदात्मनात्मानं नात्मानमवसादयेत्।**
**आत्मैव ह्यात्मनो बंधुरात्मैव रिपुरात्मनः ।।५।।**
**बंधुरात्मात्मनस्तस्य येनात्मैवात्मना जितः।**
**अनात्मनस्तु शत्रुत्वे वर्तेतात्मैव शत्रुवत् ।।६।।**

"(मनुष्याने) आपण होऊन आपला उद्धार करावा. आपण आपल्या स्वतःला अधोगतीला जाऊ देऊ नये. कारण (प्रत्येक मनुष्य) आपणच आपल्या स्वतःचा बंधू (म्हणजे मदत करणारा) किंवा आपणच आपला शत्रू आहे." ।।५।।

"ज्याने आपणच आपल्याला जिंकले तो आपल्या स्वतःचा बंधू होतो. पण ज्याने आपले मन, इंद्रिये जिंकली नाहीत तो स्वतःच स्वतःशी शत्रूप्रमाणे वैर करतो." ।।६।।

या दोन श्लोकांत भगवंतांनी आपल्याला कर्मस्वातंत्र्य दिले आहे. पूर्वसंचित काहीही असो, पण या जन्मातील प्राप्त झालेली अवस्था बदलण्याचे किंवा सौम्य करण्याचे सामर्थ्य तुझ्यात आहे. त्यामुळे "उत्तिष्ठत, जाग्रत" असा भगवंतांचा उपदेश आहे. प्रकृती कितीही बलवत्तर असली तरी तुझ्या प्रयत्नांनी अभ्यासाने, चिकाटीने, ध्येयवादाने तू ह्यात बदल करू शकतोस, हे गीतेचे सांगणे आहे.

**"नायमात्मा बलहीनेन लभ्यो"** - (मुण्डकोपनिषद् ३.२.४)

"हा आत्मा बलहीन असलेल्या पुरुषाला प्राप्त होत नाही." अध्यात्म हा दुबळ्यांचा, दैवाधीनांचा विषय नाही.

**"भक्ति तो कठिण सुळावरील पोळी।**
**निवडे तो बळी विरळा शूर।।"** - तुकाराम.

संत तुकाराम महाराजांप्रमाणेच इतर सर्व संतांनी या प्रयत्नवादाचा, सामर्थ्याचा, पौरुषत्वाचा वारंवार उल्लेख केला आहे, समर्थन केले आहे.

"यत्न तोचि देव जाणावा' असे समर्थ रामदासांनी सांगून प्रयत्नावर जोर



दिला. ज्ञानेश्वर माऊलींनी आठव्या अध्यायात प्रयत्नवादावर भाष्य करताना म्हटले आहे -

**येणेचि अभ्यासेंसि योगु। चित्तासि करीं पा चांगु।**
**अगा उपायबळे पंगु। पहाड ठाकी।।८१।।** अ.८वा

अर्थ असा - "याच अभ्यासाबरोबर चित्ताची सांगड चांगल्या प्रकारे घाल. अरे, प्रयत्नांच्या बळावर पांगळादेखील पर्वत चढून जातो." अभ्यासू माणसास काहीच दुष्कर नाही असेच सर्व संतांचे सांगणे आहे.

**असाध्य ते साध्य करिता सायास।**
**कारण अभ्यास तुका म्हणे।।**

पाचव्या व सहाव्या श्लोकांनी चैतन्य आले पाहिजे. मरगळ जाऊन नवी दृष्टी आली पाहिजे. आत्मविश्वास दृढ झाला पाहिजे. नवा आशावाद संचारला पाहिजे. मी दुबळा नसून सर्वशक्तिमान आहे अशी उभारी निर्माण झाली पाहिजे. माझ्यातल्या अव्यक्त शक्तीत सुप्तावस्थेतल्या ऊर्जेला प्रयत्नवादाने जागे केले पाहिजे असे हे श्लोक पठन केल्यावर वाटले पाहिजे. तरच गीता अभ्यासण्याचे सार्थक. भगवंतांच्या मुखारविंदातून आलेले हे जीवनतत्त्वज्ञान आहे. आजच्या निद्रिस्त, गर्भगळित झालेल्या समाजाला याच विचारांची गरज आहे. थोडेसे अपयश मिळाले की आजचा तरुण नैराश्यापोटी आत्महत्येलादेखील प्रवृत्त होतो. रोजच्या वर्तमानपत्रात या नित्याच्या घटना झालेल्या आहेत. परीक्षेतील अपयश, मनासारखी नोकरी प्राप्त झाली नाही, धंद्यातील अपयश, नैसर्गिक आपत्ती अशा विविध कारणांनी माणसे आत्मनाश करून घेतात. पूर्वपुण्याईमुळे मिळालेल्या मनुष्यजन्माचा असा फुकाफुकी शेवट होतो. यासारखे आणखी दुर्दैव कोणते? या विश्वातल्या प्रत्येक अणूरेणूत भगवंत आहे. प्रत्येक भूतमात्राच्या हृदयात त्याचा वास आहे. ज्याच्या हृदयात प्रत्यक्ष ईश्वरांश आहे, तो दुबळा होईलच कसा? जर प्रत्येक जीव त्याचा अंश आहे तर तो ईश्वराप्रत जायला असमर्थ होईलच कसा? "उद्धरेदात्मनात्मानं" मनुष्याने स्वतःच ही उच्च स्थिती प्राप्त करून घ्यावयास पाहिजे. माझ्या उत्कर्षाला व अवनतीला मीच जबाबदार आहे. सामाजिक परिस्थिती, कुळ, आईवडिलांचे संस्कार, राजकीय स्थिती, शासन, गरिबी यांचा थोडाबहुत परिणाम होतो. नाही असे नाही. पण परिस्थितीवर मात करण्याची बुद्धी, शक्ती, कल्पकता मनुष्याला ईश्वरीय देणगीच्या स्वरूपात मिळाली आहे. ती शक्ती इतर प्राण्यांत नाही म्हणून स्वतःचा उद्धार स्वतःच करून घ्यावा हे भगवंताचे सांगणे आहे.

"जे काही घडते ते केवळ ईश्वराच्याच इच्छेने मग ते व्यक्तीच्या जीवनात असो अथवा राष्ट्राच्या जीवनात असो - आपण केवळ कळसूत्री बाहुल्या आहोत." - अशा प्रकारच्या दैवाधीन झालेल्या भ्रांत ईश्वरवाद्यांना भगवंतांनी या दोन

श्लोकांत यथार्थ जाणीव करून दिली आहे. हे मानसिक दौर्बल्य घालवून टाकून प्रयत्नाची कास धरावयास गीतेने सांगितले आहे. भौतिक जीवनात असो अथवा आध्यात्मिक क्षेत्रात असो तुझ्या उत्कर्षाला व अपकर्षाला तूच जबाबदार आहेस, तुझे कर्मच कारणीभूत आहे, तुझा प्रयत्न हेच कारण आहे, असा जीवनसिद्धांत गीतेने मांडला आहे.

या दोन श्लोकांत 'आत्मा' हा शब्द पुनःपुन्हा आला आहे. संस्कृतमध्ये आत्मा या शब्दाचे (१) अंतरात्मा (२) आपण स्वतः व (३) अंतःकरण किंवा मन असे तीन अर्थ आहेत. पुढे येणाऱ्या श्लोकांतून ज्या त्या प्रसंगानुरूप जो अर्थ अभिप्रेत आहे तो आपण स्वीकारावयाचा आहे.

या सहाव्या अध्यायात मानसिक साधना समजावली आहे. ध्यानयोगात मनाचे स्थान अलौकिक, अजोड आहे. या मनाच्या अभ्यासाचे सूतोवाच सहाव्या श्लोकात झाले आहे. मन जोपर्यंत सामर्थ्यसंपन्न होत नाही तोपर्यंत आपली भक्ती फलद्रूप होणारच नाही. ''मन एव मनुष्याणां कारणं बन्धमोक्षयोः'' या अध्यायात मनाच्या अभ्यासाचा मार्ग सांगितला आहे म्हणून ह्याचे महत्त्व अधिक आहे. ज्याने आपल्या मनाला जाणले, जिंकले, त्याने जग जिंकले, पण जग जिंकूनसुद्धा मनाला जाणता आले नाही तर पराभूत भावनेने नैराश्य स्वीकारले अशा अलेक्झांडर राजाप्रमाणे आपली गत होईल.

**''मन करारे प्रसन्न । सर्व सिद्धीचे कारण ।**
**बन्ध अथवा मोक्ष । सुख समाधान इच्छा ते ।।''**

असा संत तुकाराम महाराजांनी मनाचा महिमा गायिला आहे. मनच उत्कर्ष-अपकर्ष, बन्ध-मोक्ष, सुख-दुःख, यश-अपयश... ह्या सर्वांना कारणीभूत आहे. मन ही ईश्वराची विभूती आहे. स्वतः स्वतःला जिंकणे म्हणजे मन संयमित करणे, मन जर ताब्यात नसेल तर तेच शत्रुवत होते. सर्व संत-महात्म्यांनी हे मनाचे सामर्थ्य ओळखले आहे. म्हणूनच त्याचा सतत उद्‌घोष केला आहे. समर्थ रामदासांनी मनाचे २०५ श्लोक लिहिले त्याचे हेच रहस्य आहे. सहाव्या अध्यायात हा 'मनाचा अभ्यास'च महत्त्वाचा आहे.

'गीता' हा इतर वाङ्मय प्रकारासारखा केवळ वाचण्याचा ग्रंथ नाही. समर्थ विचारांनी समृद्ध असलेल्या या ग्रंथाची कितीही पारायणे केली तरी ती कमीच. 'गीता' नित्य-नूतन आहे. ४५० हून अधिक गीता-भाष्ये आज अस्तित्वात आहेत. कुठे ना कुठे रोज ह्या ग्रंथावर काहीना काही लिहिले जाते. गीता-ज्ञानयज्ञ अखंड सुरू आहे. मानवाच्या अस्तित्वापर्यंत हे असेच चालणार. गीतेचे विचार समजून घेणे हेच महत्त्वाचे आहे. एकदा हे सिद्धांत बुद्धीत शिरले की मग त्याप्रमाणे त्याचे आचरण ओघाओघाने आलेच. विचारांनी बुद्धी व बुद्धीने कृती



जर बदलली तरच मनुष्य-जन्माचे सार्थक. गीता जीवनात आणणे हीच त्याची फलश्रुती आहे. म्हणून मी 'चिंतन' हा शब्द मुद्दाम वापरला आहे. 'चिंतनं कर्तुं चित्तम्' व 'चित्तस्य देवता वासुदेवः' असे म्हटलेले आहे. ह्या चित्तामध्ये सतत ज्याचे चिंतन करावे तशी वृत्ती आपली होते. विषयांचे चिंतन सदोदित होत असेल तर तो विषयी होईल. स्त्रीचे करीत असेल तर स्त्रैण होईल. ज्या ज्या वस्तूचे करील त्याचा आकार चित्तात ठसेल व तसे आचरण घडेल. म्हणून चित्तात सतत मांगलिक, शिवस्वरूप, सत्य, सुंदर अशा विचारांचा वर्षाव झाला पाहिजे. हे म्हणणे सोपे आहे. पण अवतीभवतीचे जग भोगात रुतलेले असताना, विषय-विकार-वासनांचे थैमान मांडलेले असताना ह्या कराल युगात गीतेचे विचार जीवनात आणणे हे किती दुरापास्त आहे हे तुम्हा-आम्हांलाच नव्हे तर भगवंतालाही ज्ञात आहे. म्हणून भागवतातदेखील ह्या कलियुगाचे असेच यथार्थ वर्णन करून त्यावर मार्ग दाखविला आहे. भागवतकार म्हणतात,

**कलेर्दोषनिधे राजन्नस्ति ह्येको महान् गुणः ।**
**कीर्तनादेव कृष्णस्य मुक्तसङ्गः परं व्रजेत् ।।** (भागवत १२/३/५१)

''हे राजा, कली हा दोषांचा सागर आहे खरा, पण त्यात एक महान गुण आहे. तो असा की, ह्या कलियुगात केवळ कृष्णाच्या गुणांचे संकीर्तन केल्याने मनुष्याची सर्व बंधांपासून मुक्तता होऊन त्याला परमपदाची प्राप्ती होते.''

कलियुगात कृष्णकीर्तन करून मुक्त होता येते असे भागवतकारांनी हजारो वर्षांपूर्वी लिहून ठेवले आहे. देहात्मवाद व अध्यात्मवाद तसेच ऐंद्रियसुख व आत्मसुख, भोग व भाव, जडवाद व ईश्वरवाद अशा संघर्षात आज माणसाला केवळ कृष्णकीर्तनच तारू शकेल. हे कीर्तन म्हणजे टाळ घेऊन केवळ भजने गाणे नव्हे. तर कृष्णाने दिलेल्या श्रेष्ठ विचारांचे जीवनात प्रत्यक्ष आचरण करणे होय. श्रीकृष्णाची स्तुति-स्तवने जरूर गावीत पण कृष्णाचे काम जो करील तोच त्याचा खरा आवडता भक्त होईल. आज कृष्ण-विचारांची गरज आहे. सहाव्या अध्यायाचे प्रयोजन हेच आहे. चित्तात नको असलेल्या अनिष्ट विकाराचे जे प्राबल्य आहे, त्याचा निरोध कसा करायचा, अनिर्बंध होत असलेल्या इंद्रियांचा निग्रह कसा करायचा व त्याची साधने कोणती हा ह्या अध्यायाचा गाभा आहे. म्हणून सहाव्या अध्यायाची आजच्या काळात खूप गरज आहे. ही मानसिक साधना माणसाचे जीवन उच्चतर, दिव्य, भव्य करू शकेल असे विचारांचे सामर्थ्य ह्या अध्यायात आहे.

- 'योगश्चित्तवृत्तिनिरोधः' ह्या पतंजलीच्या योगसूत्रावरचे हे भाष्य आहे. ज्याला योग साधला आहे, अशा उत्तम योग्याची लक्षणे ७, ८ व ९व्या श्लोकात भगवंतांनी वर्णन केली आहेत.

**जितात्मनः प्रशान्तस्य परमात्मा समाहितः ।**
**शीतोष्णसुखदुःखेषु तथा मानापमानयोः ।।७।।**
**ज्ञानविज्ञानतृप्तात्मा कूटस्थो विजितेंन्द्रियः ।**
**युक्त इत्युच्यते योगी समलोष्टाश्मकाञ्चनः ।।८।।**
**सुहृन्मित्रार्युदासीनमध्यस्थद्वेष्यबंधुषु ।**
**साधुष्वपि च पापेषु समबुद्धिर्विशिष्यते ।।९।।**

''ज्याने आपला आत्मा म्हणजे अंतःकरण जिंकले व ज्याला शांती प्राप्त झाली त्याचा परमात्मा शीतोष्ण, सुखदुःख आणि मानापमान यांच्या ठिकाणी समाहित म्हणजे सम व स्थिर राहतो.'' ।।७।।

''ज्याचा आत्मा ज्ञानाने आणि विज्ञानाने म्हणजे विविध ज्ञानाने तृप्त झाला, ज्याने आपली इंद्रिये जिंकली, जो कूटस्थ म्हणजे मुळास जाऊन पोहोचला आणि माती, दगड, सोने सारखेच मानू लागला अशा योगी पुरुषास(च) युक्त म्हणजे सिद्धावस्थेस पोचलेला असे म्हणतात.'' ।।८।।

''सुहृद्, मित्र, शत्रू, उदासीन, मध्यस्थ, द्वेष करण्यास योग्य व बांधव यांच्या ठायी तसेच साधूंच्या आणि दुष्टांच्या ठायीही ज्यांची बुद्धी सम झाली तोच विशेष योग्यतेचा म्हणावयाचा.'' ।।९।।

'जितात्मा' हे पहिले लक्षण! ज्याने लोभ, मोह, प्रलोभन ह्यावर विजय मिळविलेला आहे असा. 'परमात्मा' हा शब्ददेखील आत्म्यालाच अनुलक्षून आहे. मनुष्याच्या शरीरातील 'आत्मा' हा तत्त्वतः परमात्म्याचा अंश नव्हे तर परमात्माच आहे. आत्मा जेव्हा विषयविकारांनी बद्ध होतो, तेव्हा मूळ त्याचे स्वरूप 'जीवात्म्या'चे होते, पण तोच जेव्हा गुणातीत होतो, तेव्हा सच्चिदानंदस्वरूपास प्राप्त होतो. हाच जीवात्मा इंद्रियसंयमाने व उपाधींवर विजय मिळवून परमात्मरूपी बनू शकतो. 'प्रशान्त' म्हणजे सुद्धा जो विषयविकारांपासून जरासुद्धा विचलित, चलबिचल, अस्थिर होत नाही, असा शांत पुरुष.

दहाव्या श्लोकात एकांताची आवश्यकता योग्यास महत्त्वाची असल्याचे प्रतिपादन केले आहे.

**योगी युंजीत सततमात्मानं रहसि स्थितः ।**
**एकाकी यतचित्तात्मा निराशीरपरिग्रह'' ।।१०।।**

''जो योगी आहे त्याने एकांतात एकटे राहून चित्त व आत्मा आवरून, कोणतीही कामवासना न ठेवता, परिग्रह म्हणजे संग्रहवासना न ठेवता सतत आपल्या योगाभ्यासास लागावे.''

योग्याला आवश्यक असणारे हे गुण आहेत. साधनेसाठी एकांत हवा. कोलाहल, अशांतता असलेल्या ठिकाणी चित्त एकाग्र होऊ शकत नाही. भक्तीला पोषक वातावरण पाहिजे. अन्यथा भूत-वर्तमान-भविष्यातील घटनांचा वेध घेत



मन त्रैलोक्यात संचार करायला लागते. ब्राह्मसमयी, नीरव शांततेत शुभ विचारांचे चिंतन सहजसाध्य होते. म्हणून स्थळ-काळ-वेळ ह्यांचाही साधनेत महत्त्वाचा भाग आहे. पूजा वगैरे विधी अशा शांत अवस्थेत पार पडल्या नाहीतर तर ते केवळ कर्मकांड होते. चित्त एकीकडे व विधी-उपचार दुसरीकडे अशी अवस्था होते. 'निराशीः' म्हणजे ज्याला इंद्रियासक्ती नसते असा! कोणतीही आसक्ती किंवा संग्रहवासना न ठेवता योगाभ्यास करावा.

आता 'ध्यान' कोठे करावे, आसन कसे असावे. त्याचे सविस्तर वर्णन ११,१२,१३ या श्लोकांत आले आहे. ''शुचौ देशे प्रतिष्ठाप्य...'' अशी स्थानमहती सांगून, मन एकाग्र करून आत्मशुद्ध्यर्थ आसनावर बसून योगाचा, ध्यानाचा अभ्यास करावा असे वर्णन आहे. ते श्लोक पुढीलप्रमाणे -

**शुचौ देशे प्रतिष्ठाप्य स्थिरमासनमात्मनः ।**
**नात्युच्छ्रितं नातिनीचं चैलाजिनकुशोत्तरम् ।।११।।**
**तत्रैकाग्रं मनः कृत्वा यतचित्तेंद्रियक्रियः ।**
**उपविश्यासने युंज्याद्योगमात्मविशुद्धये ।।१२।।**
**समं कायशिरोग्रीवं धारयन्नचलं स्थिरः ।**
**संप्रेक्ष्य नासिकाग्रं स्वं दिशश्चानवलोकयन् ।।१३।।**

''पवित्र जागी, खाली दर्भासन, त्यावर मृगाचे कातडे, वर वस्त्र घातलेले, असे फारच उंच नव्हे व फार सखल नव्हे असे आपले आसन स्थिर मांडावे.'' ।।११।।

''त्या आसनावर बसून मन एकाग्र करून चित्त व इंद्रिये यांच्या हालचाली आवराव्यात. आणि अंतःकरण शुद्धीसाठी योगाभ्यास करावा.'' ।।१२।।

''अशाप्रकारे हालचाल न करता साधकाने पाठीचा कणा, मान व मस्तक एका रेषेत स्थिर ठेवावीत आणि आजूबाजूला न पाहता नाकाच्या शेंड्याकडे किंवा भुवयांच्या मध्ये दृष्टी ठेवावी.'' ।।१३।।

योगी होण्यासाठी चित्ताची एकाग्रता कशी करावी याचे हे मार्गदर्शन आहे. एकांताचा स्वीकार केला पाहिजे. साधी पूजासुद्धा नीरव शांततेत केली तर तिची फलप्राप्ती होते. कोलाहलामध्ये विचारांचीसुद्धा मनात गर्दी होते. एकांतातसुद्धा मन भूतकाळात तरी रमते नाहीतर भविष्याचे चिंतन करत राहते. एकांतात केवळ वर्तमानाचा विचार करून मन निर्विषय करण्याचा प्रयत्न केला पाहिजे. इंद्रियासक्ती सोडून, अपरिग्रहवृत्ती अंगीकारून ध्यानाला बसले पाहिजे. तरच ध्यान होते. त्यासाठी स्थानाचीही पवित्रता पाहिजे व साधकाचीही अंतर्शुद्धी!

या पुढील १४ वा श्लोक महत्त्वाचा आहे -

**प्रशान्तात्मा विगतभीर्ब्रम्हचारिव्रते स्थितः ।**
**मनः संयम्य मच्चित्तो युक्त आसीत मत्परः ।।१४।।**

"भीती न बाळगता, शांत अंतःकरणाने, ब्रह्मचर्य व्रत पाळून व मनाचे संयमन करून चित्त माझ्याच ठिकाणी लावून मत्परायण होत्साता युक्त होऊन बसावे."

ध्यान करीत असताना साधकाने कसे असले पाहिजे याचे हे वर्णन आहे. मन प्रशांत असले पाहिजे. विकार-विषयांनी अस्थिर, चंचल, अशांत झालेल्या मनाने हे साध्य नाही. इंद्रियांना मनानेच आवरले पाहिजे. मनाची हाव, तृष्णा जर कमी झाली नाही व अप्राप्य वस्तूंचे सतत चिंतन होत असेल तर ते एकाग्र कसे होईल? इंद्रिये-मन तर स्वभावतःच बहिर्मुख असतात. सतत बाहेरच्या विश्वाकडे धाव घेणाऱ्या या इंद्रियांना अंतर्मुख केल्याशिवाय ध्यान होणार नाही. 'विगतभीः' म्हणजे निर्भय असले पाहिजे. ज्या भगवंताजवळ जायचे आहे त्याच्याविषयीची भीती साधकाच्या मनात असता कामा नये. भगवंताविषयी पूर्ण प्रेम वाटले पाहिजे. भक्ती म्हणजे प्रेम. Love is God & God is Love. ईश्वर प्रेममय आहे. नारदीय भक्तिसूत्रामध्ये भक्तीची व्याख्या हीच केली आहे.

"सा त्वस्मिन् परमप्रेमरूपा अमृतस्वरूपा च ।" भगवंतावर प्रेम करणे हीच भक्ती. हा प्रेमप्रवाह प्रत्येकात स्रवत असतो. ज्याला त्याची जाणीव झाली त्यालाच भक्ती अवगत झाली. हीच God-loving mentality व त्याविरुद्ध असलेली God-fearing mentality. ईश्वराविषयीच्या भीतीतून भक्ती करणे ही भगवंताला आवडेलच कशी? भगवान "कर्तुं अकर्तुं अन्यथाकर्तुं" समर्थ आहे. म्हणून प्रेम जर असेल तर तेही गौण स्वरूपाचे. निरनिराळ्या संबंधांनी भगवंताकडे जाता येते. "श्रवणं कीर्तनं विष्णोः स्मरणं..." अशा नवविधा भक्तीने भगवंताची आराधना करता येते. पण यात सर्वश्रेष्ठ भक्ती प्रेममयच. भगवंतावरील हे प्रेम कसे असावे? नारदांनीच त्याचे उत्तर दिले आहे.

**"गुणरहितं कामनारहितं प्रतिक्षणवर्धमानं**
**अविच्छिन्नं सूक्ष्मतरं अनुभवरूपम्"** (नारदीय भक्तिसूत्र)

गुणरहित प्रेम हेच श्रेष्ठ प्रेम! खरे प्रेम!! खरी भक्ती. जे कामनारहित व सतत वर्धिष्णू होणार आहे. अशा प्रेमाची अनुभूती घेणे हे आत्मज्ञान करून घेण्यासारखे आहे. आईकडे जाताना मुलाला भीती वाटत नाही. देवानेदेखील आपल्याला हाक मारावी असे भक्ताला वाटले पाहिजे. संत तुलसीदासांनी हीच मागणी केली होती.

**"भगवान, एक बार कहो, तुलसीदास मेरा"**

ईश्वराविषयीचे अनन्य प्रेम हे भक्तीचे खरे स्वरूप. भीतीने नव्हे तर प्रेमाने ध्यान केले पाहिजे. 'विगतभीः' ह्यात जशी भगवंताबद्दलची भीती असू नये तशीच स्वस्थितीबद्दलही साधकाच्या मनात भीती असता कामा नये. दृढ श्रद्धा, विश्वास, अचल निष्ठा असेल तर ही भीती राहत नाही. मी करतोय ते बरोबर आहे; ईश्वराप्रत नेणारे आहे. अशी स्वतःच्या साधनेबद्दल खात्री पाहिजे. या



जन्मातच हे प्राप्य होईल का? माझी साधना सफल होईल का? मध्येच मृत्यूने गाठले तर... अशा निरनिराळ्या प्रकारे भीतीने ग्रासलेले मन ध्यानात एकाग्र कसे होईल? या श्लोकात 'मच्चित्तः', 'मत्परः' हे दोन शब्द चिंतनीय आहेत. गीतेत हे शब्द वारंवार आलेले आहेत. 'मच्चित्तः' म्हणजे चित्त माझ्या ठिकाणी लावलेला व 'मत्परः' म्हणजे मत्परायण झालेला... **'मन्मना भव'** (९.३४), **'मय्येव मन आधत्स्व'** (१२.८), **'मत्कर्मकृन् मत्परमो'** (११.५५), **'चेतसा मयि संन्यस्य'** (१८.५७), **'मद्व्यपाश्रयः'** (१८.५६), **'मच्चिता मद्गतप्राणा'** (१०.९), **'मच्चित्तः सर्वदुर्गाणि'** (१८.५८)... अशा अनेक श्लोकांमध्ये भगवंतांनी भक्तीचे रहस्य सांगितले आहे. **'मय्यावेश्य मनो ये मां'** (१२.२) म्हणजे ईश्वराच्या ठिकाणी मन व बुद्धी अर्पण करणारा भक्त ईश्वराचा प्रिय भक्त आहे. आता मन अर्पण करणे म्हणजे काय? मनाच्या विविध वृत्तींचा निरोध करून त्याला ईश्वराच्या म्हणजे स्वतःच्या शुद्ध सच्चिदानंद स्वरूपात स्थिर करणे हेच मन अर्पण करणे होय.

चित्त ज्या वस्तूचे चिंतन करील त्याचाच आकार, गुण, रूप हे सर्व काही ग्रहण करते म्हणून चिंतन करण्यासाठी व एकाग्रता साधण्यासाठी सर्वगुणसंपन्न अशा भगवंताची सगुण प्रतिमा मनासमोर असावी. निर्गुणरूपात मनाची एकाग्रता साधणे सामान्य साधकास कठीण होते, म्हणून सगुणरूपाचे ध्यान. सगुणातून निर्गुणाकडे हे भक्तीचे शास्त्र ह्या मनाच्या वृत्तीतूनच उद्‌भवले आहे. जर जड वस्तूचे चिंतन होईल तर जडाचाच ते आकार घेईल. म्हणून चित्त कशात एकाग्र करावे? दैवी, अलौकिक गुणांनी संपन्न, पवित्र, वंदनीय, सर्वशक्तिमान, वैभवसंपन्न, यशःश्रीने युक्त अशा प्रतिमेत. मग ती कोणतीही उपास्य देवता असो. अशा भगवंताच्या साकार रूपाचे चिंतन जर मनाने एकाग्र होऊन केले तर ते त्याचाच आकार घेईल. मूर्तिपूजेत अशी शास्त्रीय भक्ती आली तर 'सगुणोपासनेची' अवहेलना कोणी करणार नाही. भक्तिशास्त्राचे महान भाष्यकार श्री. मधुसूदन सरस्वतींनी भक्तीची केलेली व्याख्या यादृष्टीने अतिशय परिपूर्ण आहे. ते म्हणतात-

**"द्रुते चित्ते प्रविष्टा या गोविंदाकारता स्थिरा सा भक्तिः ॥"**

"चित्त जेव्हा द्रवीभूत होते, ते गोविंदाकारात स्थिर होते, त्याला भक्ती म्हणतात." 'मच्चितः', 'मत्परः' असा होऊन जो मन ताब्यात ठेवून योगाभ्यास सतत चालू ठेवील त्यास शांती प्राप्त होईल असे १५ व्या श्लोकात भगवंत प्रतिपादितात.

यानंतरच्या चार श्लोकांत 'चित्तवृत्तिनिरोधाची पूर्णावस्था' वर्णन केली आहे. परिमित म्हणजे संयमित अशा युक्त अवस्थेचे वर्णन यात आहे.

**नात्यश्नतस्तु योगोऽस्ति न चैकान्तमनश्नतः ।**
**न चातिस्वप्नशीलस्य जाग्रतो नैव चार्जुन ॥१६॥**

युक्ताहारविहारस्य युक्तचेष्टस्य कर्मसु।
युक्तस्वप्नावबोधस्य योगो भवति दुःखहा ।।१७।।
यदा विनियतं चित्तमात्मन्येवावतिष्ठते ।
निःस्पृहः सर्वकामेभ्यो युक्त इत्युच्यते तदा ।।१८।।
यथा दीपो निवातस्थो नेंगते सोपमा स्मृता ।
योगिनो यतचित्तस्य युंजतो योगमात्मनः ।।१९।।

''अतिशय खाणाऱ्यास किंवा मुळीच काही न खाणाऱ्यास आणि झोपाळूस किंवा जागरण करणाऱ्यास हा योग, हे अर्जुना! सिद्ध होत नाही.'' ।।१६।।

''ज्याचा आहारविहार माफक, कर्माचरण बेताचे आणि झोप व जागरण परिमित त्याला हा योग दुःखघातक म्हणजे सुखावह होतो.'' ।।१७।।

''आवरून धरलेले मन जेव्हा आत्म्याच्याच ठिकाणी स्थिर होते आणि कोणत्याही उपभोगाची इच्छा राहत नाही, तेव्हा तो युक्त झाला असे म्हणतात.'' ।।१८।।

''निवांत जागी ठेवलेला दिवा म्हणजे दिव्याची ज्योत जशी निश्चल राहते तीच उपमा चित्त आवरून आपला योगाभ्यास करणाऱ्या योग्यास दिली आहे.'' ।।१९।।

'ध्यानयोग' किंवा 'आत्मसंयम योग' असे नामाभिधान असणाऱ्या या अध्यायात चार प्रमुख गोष्टी आलेल्या आहेत -

१) स्वतःचा उद्धार स्वतः करू शकतो.
२) चित्ताची एकाग्रता.
३) संयमित जीवन.
४) आत्मौपम्य किंवा समदृष्टी.

अभ्यास व वैराग्याने हे सर्व साध्य होऊ शकेल, हा भगवंतांनी मनुष्याला दिलेला दिलासा आहे. गीता सर्वस्पर्शी आहे. जीवनाच्या प्रत्येक दालनाला योग्य तो न्याय दिलेला आहे. मानवी जीवन परिपूर्ण कसे होईल त्याचा बारीक-सारीक तपशील गीताकारांनी मांडला आहे. गीताकारांनी या जीवनशुद्धीसाठी संयमित, परिमित जीवनाचा आदर्श आपल्यासमोर ठेवला आहे. संयम हा साधनेचा मंत्र आहे. ज्याला तो साधला त्याला योग साधला. केवळ अध्यात्मातच नाही तर व्यवहारातसुद्धा या गुणांची आवश्यकता आहे. अध्यात्म हे नेहमीच्या दैनंदिन व्यवहारापासून वेगळे आहे, त्याचा प्रत्यक्ष जीवनाशी काही संबंध नाही ही एक अशीच चुकीची धारणा. सकाळी जाग आल्यापासून रात्री झोपेपर्यंत किंबहुना झोपेतदेखील ज्या-ज्या क्रिया मग त्या शारीरिक असोत अथवा मानसिक, या सर्वांचा संबंध अध्यात्माशी आहे. जागृती, स्वप्न, सुषुप्ती यांमध्ये अध्यात्म वेगळे व व्यवहार वेगळा हा भाव ठेवता कामा नये. अध्यात्माने जीवन पूर्ण बदलले पाहिजे. गीता जीवनात बदल घडवून आणणार नसेल तर ती अभ्यासायची तरी कशाला?



त्यानंतरच्या श्लोकांत 'युक्त', 'योगी' पुरुषाचे वैभव वर्णन केले आहे. अशा आत्मतृप्त योग्याला भोगविषयांचे आकर्षण राहत नाही. आत्मलाभासारखे गोड दुसरे काहीच पाहत नसल्यामुळे भोगविषयात त्याचे मन रमत नाही. अशा साधकाची आत्मिक स्थिती कशी असते, यासाठी एक सुंदर उपमा १९ व्या श्लोकात वर्णिली आहे. असा प्रसन्नचित्त, प्रशांत, स्थिर, संयमी योगी हा निवांत जागी ठेवलेल्या ज्योतीसारखा स्थिर असतो. हीच उपमा ज्ञानेश्वर माऊलींनी अशा प्रसन्नचित्त पुरुषाचे वर्णन करताना दिली आहे

**जैसा निर्वातीचा दीपु। सर्वथा नेणे कंपु।**
**तैसा स्थिरबुद्धि स्वस्वरूपु। योगयुक्तु ।।** ज्ञानेश्वरी-३४१)

''ज्याप्रमाणे निवाऱ्याच्या ठिकाणी असलेली दिव्याची ज्योत मुळीच हालत नाही, त्याप्रमाणे योगयुक्त पुरुष स्वस्वरूपी स्थिर बुद्धीने राहतो. आत्मस्वरूपी साधकाची बुद्धी स्थिर राहते. चित्त प्रसन्न होते व त्याला अक्षय आत्मसुखाची प्राप्ती होते.''

१६ व १७ हे दोन श्लोक, केवळ योग्यांसाठीच नव्हे तर प्रत्येक व्यक्तीस, आरोग्याच्या सर्वांगीण हितासाठी मार्गदर्शन करणारे आहेत. या २१ व्या शतकाच्या सुरुवातीस जागतिक आरोग्य संघटनेने भारतीय जनतेस इशारा दिला आहे. २०२० सालापर्यंत या देशात ४० टक्क्यांवर लोक मधुमेह, रक्तदाब व हृदयविकार तसेच नैराश्य, मानसिक तणाव अशा मनोविकारांनी पीडित होऊन मृत्यूचे प्रमाण बेसुमार वाढेल. एचआयव्ही, कॅन्सरसारखे जीवघेणे रोग त्याच्या जोडीला आहेतच.

पाच हजार वर्षांपूर्वी भगवान श्रीकृष्णांनी या श्लोकांतून, यावर उपाय सांगितला. आपला आहार व विहार संतुलित, संयमित असेल व रोजच्या जीवनात हरघडी हातून होणारी कर्मे मर्यादित, परिमित असतील, निद्रा शांतपणे घेण्यासाठी, तीही संतुलित असेल तर तो मनुष्य आरोग्यसंपन्न निश्चित होईल. एकूण जीवनच जर संयमित, नियंत्रित असेल तर विकार व तणाव यांना त्यात थारा राहणार नाही. साधनेच्या मार्गात, भोजन जर नियंत्रित नसेल व आळसाने निष्क्रियता आली असेल तर साधनासुद्धा नीट होणार नाही. अन्नाचा पूर्ण त्याग किंवा अती अन्नभक्षण हे दोन्हीही वर्ज्य!

कठोपनिषदात या शरीराला रथाची उपमा दिली आहे. 'आत्मानं रथिनं विद्धि । शरीरं रथं एव तु ।'.. शंभर वर्षे जगावे असा हा रथ जर संयमाने राजरस्त्यावरून चालला तर तो दीर्घकाळ चालू शकतो, पण असमतोल, ओबडधोबड मार्गावरून चालला तर मध्येच रुततो, कोलमडतो, अडतो व पथभ्रष्ट होतो. शंभर वर्षांची यात्रा पूर्ण करण्यासाठी हे शरीररूपी भगवंताचे मंदिर स्वच्छ,

शुद्ध, पवित्र, स्वस्थ, बलिष्ठ ठेवणे आवश्यक आहे. व्याधिग्रस्त, दुबळे शरीर भगवंताला प्राप्त करू शकत नाही. विषय-भोगात रुतलेल्या शरीरात आत्मबळ कसे प्राप्त होणार? जसे भगवंताला अर्पण करावयाचे फूल टवटवीत व सुगंधी असावे लागते तसे हे शरीरसुद्धा सुदृढ, शुद्ध, पवित्र असावे लागते. सडलेले, सुकलेले, रसहीन, जीर्ण झालेले फळ भगवंताला कसे अर्पण करता येईल? शरीराचेही असेच आहे. म्हणून या रथाला आहाराचे संयमित इंधन पुरविले तरच रथ ठीकठाक चालेल.

दक्षिणेकडील महान संत तिरुवल्लुवर यांनी आहाराच्या बाबतीत खूप उपदेश केला आहे. ते म्हणतात की, भोजन करण्यापूर्वी अन्नाकडे पाहत स्वतःला प्रश्न विचारला पाहिजे की, हे अन्न पवित्र आहे की नाही! कोणाला लुबाडून, अनीतीने तरी हे मिळविले नाही ना? अशी जर पापाने बरबटलेली भाकरी नसेल तर ते अन्न निश्चितच मनाला शांती देईल. असे पवित्र अन्न मनातदेखील विकार निर्माण करणार नाही. असे अन्न हवन करून राहिलेले अन्न भक्षण करावे असा सुंदर उपदेश त्यांनी केला आहे. गीतेचेच विचार सर्व संतांनी आपापल्या शैलीने जगाला सांगितले. आपण जसे अन्न खातो तसेच आपले मन घडत असते. जसे मनं तशी वृत्ती व तसा व्यवहार हातून घडतो. म्हणून शुद्ध, पवित्र, सात्त्विक अन्नाचे भक्षण करण्याचा आग्रह गीता करते.

चरक ऋषींनी आयुर्वेदातसुद्धा हेच सूत्ररूपाने सांगितले. ते म्हणतात -

**''हित भुक् मित भुक् ऋत भुक्''**

ऋतुमानाप्रमाणे अन्न भक्षण करावे, जे हितकर आहे तेच ग्रहण करावे, शरीराला अनुकूल, पुष्टी देणारे अन्नच स्वीकारावे असा उपदेश त्यांनी केला.

म्हणून नियमित, मर्यादित, संतुलित आहार आरोग्यवर्धक असतो. पण असे अन्नसुद्धा प्रसन्न चित्ताने, परिश्रम करून, प्रभूचा प्रसाद समजून ग्रहण करावे म्हणजे त्याचा स्वाद, सुगंध काही वेगळाच मिळतो.

जसे आहाराचे तसेच निद्रेचे! झोप अपुरी झाली की सगळे बिघडते. योग्य विहाराने, परिश्रमाने आणि विकाररहित अवस्थेने मन शांत होते व नीट झोप लागते. दिवसभर सुंदर विचारांचे चिंतन, मनन होत असेल तर निद्रेतसुद्धा उत्तम स्वप्ने पडतात. म्हणून जागृती, सुशुप्तीमध्ये विचारांचा, भावनेचा ताळमेळ असतो. 'जे मनी वसे, ते स्वप्नी दिसे,' हे खरेच आहे. कोणत्या वयात किती निद्रा घ्यावी याचेही प्रमाण आहे. उतारवयात झोप कमी येते म्हणून उत्तम कार्यात थोडे-अधिक झोकून द्यावे. मुलांना, तरुणांना झोप अधिक कारण त्यांचे वाढण्याचे वय असते. अशी एक म्हण आहे,

**''पेट नर्म, पाँव गर्म, सिर ठण्डा, डॉक्टर**
**आये तो मारो डण्डा''**



भूक नीट लागली की पचनक्रियाही उत्तम होते व पोटाची काही तक्रार राहत नाही. उत्तम व्यायाम, चालणे असेल तर पायात तेज येते. या सर्व कारणांनी गाढ निद्रा येते म्हणून डोके थंड राहते. एवढे सगळे व्यवस्थित असेल तर डॉक्टरची गरजच काय?

झोप अपुरी झाली की, डिप्रेशन, नैराश्य, तणाव याला बळी पडावे लागते. अमेरिकेत करोडो लोकांना झोप मिळविण्यासाठी गोळ्या खाव्या लागतात. आपल्याकडे चुकीच्या जीवनशैलीमुळे हे प्रमाण दिवसेंदिवस वाढतच आहे. फास्ट फूड म्हणजे फास्ट डेथ. अपरिमित भोगांची लालसा म्हणजे अनेक विकारांना आमंत्रण. विवेकनाश करणाऱ्या या जीवनपद्धतीला वेळीच नियंत्रित करून या सर्व रोगांपासून आपण मुक्त होऊ शकतो. भगवान श्रीकृष्णांचे हे विचार केवळ पारलौकिक कल्याण करणारे नसून आपले ऐहिक जीवनसुद्धा संपन्न करणारे आहेत.

योगयुक्त पुरुष स्वस्वरूपी स्थिर बुद्धीने राहतो. अशा आत्मस्वरूपी साधकाला अक्षय आत्मसुखाची प्राप्ती होते. निवाऱ्याच्या ठिकाणी निश्चल असलेल्या दिव्याच्या ज्योतीची उपमा अशा पुरुषाला दिली आहे. त्याला लाभणाऱ्या सुखाचे वर्णन २० ते २३ ह्या श्लोकांत केले आहे.

**यत्रोपरमते चित्तं निरुद्धं योगसेवया ।**
**यत्र चैवात्मनात्मानं पश्यन्नात्मनि तुष्यति ।।२०।।**
**सुखमात्यंतिकं यत्तद्बुद्धिग्राह्यमतींद्रियम् ।**
**वेत्ति यत्र न चैवायं स्थितश्चलति तत्त्वत ।।२१।।**
**यं लब्ध्वा चापरं लाभं मन्यते नाधिकं ततः ।**
**यस्मिन् स्थितो न दुःखेन गुरुणापि विचाल्यते ।।२२।।**
**तं विद्याद् दुःखसंयोगवियोगं योगसंज्ञितम् ।**
**स निश्चयेन योक्तव्यो योगोऽनिर्विण्णचेतसा ।।२३।।**

''योगानुष्ठानाने निरोध होऊन चित्त ज्या ठिकाणी रममाण होते, आणि जेथे आपण आत्म्याला पाहून आत्म्यातच संतुष्ट होऊन राहतो.'' ।।२०।।

''जेथे (केवळ) बुद्धिगम्य व इंद्रियांना अगोचर असे जे अत्यंत सुख त्याचा त्याला अनुभव घडतो आणि जेथे तो (एकदा) स्थिरावला म्हणजे तत्त्वापासून केव्हाही ढळत नाही.'' ।।२१।।

''ज्या आत्मस्वरूपाचा लाभ झाला असता त्यापेक्षा अधिक कोणताही लाभ नाही, असे तो मानतो. आणि जीवनात कितीही मोठे दुःख प्राप्त झाले असले तरी ते (त्याला) तेथून विचलित करू शकत नाही.'' ।।२२।।

''चित्तवृत्तींच्या या निरोधाला 'दुःखाच्या स्पर्शापासून वियोग' म्हणजे 'योग' असे

म्हणतात. आणि हा योग मन कंटाळू न देता निश्चयाने आचरिला पाहिजे." ।।२३।।

ह्या चार श्लोकांचे मिळून एकच वाक्य आहे. जे सुख केवळ बुद्धिग्राह्य आहे अशा ब्रह्मानंदाचे हे वर्णन आहे. हीच ब्राह्मीस्थिती! आत्मसुखाची ही अवीट गोडी चाखल्यानंतर इंद्रियग्राह्य सुखाची जराही इच्छा राहत नाही आणि ऐहिक जगतातील कितीही दुःखाचे डोंगर जरी कोसळले तरी अशा योग्याचे चित्त विचलित होत नाही. ह्या ठिकाणी भगवंतांनी योगाची एक नवीन व्याख्या "दुःखाचा वियोग म्हणजे योग" अशी केली आहे. "समत्वं योग उच्यते", "योगः कर्मसु कौशलं" योगाची अशी व्याख्या भगवंतांनी यापूर्वी दुसऱ्या अध्यायात केली आहे. ही आणखी एक व्याख्या. इथे सुखदुःखाचा संबंध आहे. आत्मसुख अविनाशी आहे. बुद्धी व इंद्रिये कितीही समर्थ असली तरी त्यांना हा आत्मानंद घेता येत नाही. जेव्हा मनाची धाव संपते, वृत्ती स्थिर होतात तेव्हाच अशा आनंदाची प्राप्ती होते. हे सुख बाह्य पदार्थांपासून मिळत नसून आतच त्याचा अखंड झरा वाहत असतो. आपल्याच अज्ञानामुळे, अविद्येच्या आवरणामुळे हे सुख आपणाला लाभत नसते. वस्तूपासून कितीही भौतिक सुख लाभले तरी त्याला आदिअंत आहे. डॉक्टर ऑपरेशनच्या वेळी भूल देतात. काही वेळपर्यंत वेदनांची जाणीवही होत नाही. पण भूल उतरली की पुन्हा दुःख! विषयापासून मिळणारे सुखही असेच. पण आत्मसुखात ही क्षणभंगुरता नाही. हे सुख प्राप्त झालेल्या योग्याला मृत्यूचे भय नसते, देहादिक दुःखाचे भान नसते, दुःखाचा लवलेश नसतो. म्हणून याला 'योग' म्हटले आहे. कठोर निश्चय करून उत्साही अंतःकरणाने युक्त होऊन या योगाचे अनुष्ठान करण्याविषयी प्रयत्नपूर्वक लाग, असा अर्जुनाला भगवंत उपदेश करतात.

आता चित्त एकाग्र करण्यासाठी कसे बसावे ह्याचे वर्णन २४ व २५ श्लोकांत गीताकार करतात -

**संकल्पप्रभवान्कामांस्त्यक्त्वा सर्वानशेषतः ।**
**मनसैवेन्द्रियग्रामं विनियम्य समन्ततः ।।२४।।**
**शनैः शनैरुपरमेद्बुद्ध्या धृतिगृहीतया ।**
**आत्मसंस्थं मनः कृत्वा न किंचिदपि चिंतयेत् ।।२५।।**

"संकल्पापासून उत्पन्न होणाऱ्या सर्व कामांचा म्हणजे वासनांचा निःशेष त्याग करून आणि सर्व इंद्रियांचे मनानेच चोहोंकडून नियमन करून." ।।२४।।

"धैर्ययुक्त बुद्धीने हळूहळू शांत होत जावे, आणि मन आत्म्याच्या ठिकाणी स्थिर करून काहीही विचार मनात येऊ देऊ नये." ।।२५।।

अशा रीतीने चित्त एकाग्र करून चंचल व अस्थिर मन जिकडून जिकडून बाहेर फुटू लागेल तिकडून तिकडून त्याचा निरोध करून त्याला आत्म्याच्याच ताब्यात आणावे. अशा प्रकारे शांतचित्त, स्थिर व ब्रह्मभूत झालेल्या योग्याला



उत्तम सुख प्राप्त होते. तो पापमुक्त होऊन ब्रह्मानंदात सतत अवीट सुखाचा आस्वाद घेत राहतो. असे २६, २७, २८ या तीन श्लोकांत योगाभ्यासाने मिळणाऱ्या फळाचे वर्णन केले आहे. ते श्लोक असे -

**यतो यतो निश्चरति मनश्चंचलमस्थिरम् ।**
**ततस्ततो नियम्यैतदात्मन्येव वशं नयेत् ।।२६।।**
**प्रशान्तमनसं ह्येनं योगिनं सुखमुत्तमम् ।**
**उपैति शान्तरजसं ब्रह्मभूतमकल्मषम् ।।२७।।**
**युंजन्नेवं सदाऽऽत्मानं योगी विगतकल्मषः ।**
**सुखेन ब्रह्मसंस्पर्शमत्यंतं सुखमश्नुते ।।२८।।**

"(अशा रीतीने चित्त एकाग्र करीत असता) चंचल व अस्थिर मन जिकडून जिकडून बाहेर फुटू लागेल तिकडून तिकडून निरोध करून ते आत्म्याच्याच ताब्यात आणावे." ।।२६।।

"याप्रकारे शान्तचित्त, रजोविरहित, निष्पाप, ब्रह्मभूत झालेल्या योग्याला उत्तम सुख प्राप्त होते." ।।२७।।

"याप्रमाणे सतत आपला योगाभ्यास करणारा योगी पापासून सुटून ब्रह्मसंयोगापासून प्राप्त होणाऱ्या अत्यंत सुखाचा सुखाने उपभोग घेतो." ।।२८।।

चित्त एकाग्र होत नाही ही साधकांचीच नव्हे तर सार्वत्रिक तक्रार असते. मनात सतत संकल्प-विकल्प असेल तर मन स्थिर होत नाही. जोपर्यंत विचारांची गर्दी मनात आहे तोपर्यंत मन अशांतच राहणार. इंद्रियांचा निग्रह होत नाही तोवर चित्तात एकाग्रता येणार नाही.

आदिशंकराचार्यांनी एक सुंदर प्रश्न विचारला, "जगत् जितं केन?" जगाला कोणी जिकले? - उत्तर दिले, "मनो हि येन" - ज्यांनी मन जिंकले त्यांनी संसारावर विजय प्राप्त केला. पुन्हा प्रश्न केला, "मग या मनाच्या विजय प्राप्त करण्यामध्ये खरे शत्रू कोण?" - 'के शत्रवः सन्ति?' उत्तर दिले, "निजेन्द्रियाणि" - तुमची इंद्रिये. तुमचे शत्रू दुसरे कोणी नाहीत. तुमची नाठाळ इंद्रिये हेच तुमचे खरे शत्रू. पुन्हा प्रश्न केला, "मग मित्र कोण?" उत्तर मिळाले - हीच इंद्रिये तुमचे मित्र आहेत. खरेच आहे. जेव्हा इंद्रियांवर आपण ताबा मिळवितो तेव्हा ती आपले मित्रच होतात व जेव्हा इंद्रिये आपल्यावर प्रभुत्व, मालकी गाजवितात त्या वेळी ते आपले शत्रूच असतात. ही इंद्रियेच भल्याभल्यांना, विद्वानांना, साधकांना अधोगतीस नेतात. आपणच आपले मित्र असतो व आपणच आपले शत्रू असतो. आपले चित्त अभ्यासाने व वैराग्याने स्थिर केले पाहिजे. मीच माझा भाग्यविधाता आहे. भगवंतावर संपूर्ण विश्वास ठेवून, त्याला शरणागत जाऊन, मन त्यालाच अर्पण करून हळूहळू हे चित्त शांत, स्थिर करावे. आपले संकल्प जर ईश्वरीय संकल्प झाले तर वासनाक्षय होणे सुलभ होईल. 'मी' 'मी'च्या ठिकाणी 'तू'

'तू' हा भाव आणावा. जे जे काही हातून घडेल ते ते सर्व तुझ्यासाठीच असा भाव ठेवून जगणाऱ्याचा आधार फक्त भगवंतच राहतो. असा संयमित झालेला पुरुष मग अखंड शांतीचा अनुभव घेतो. जिथे शांती तेथे सुख. असा योगी अक्षय्य सुखाचा धनी होतो.

साम्यबुद्धी प्राप्त करण्यास साधन म्हणून हा पातंजल योग ह्या अध्यायात वर्णिला आहे. ह्या योगाची प्राप्ती हठयोगाने किंवा बलाने नव्हे तर मनानेच हे प्राप्त करावयाचे आहे. मनाचा निरोध करण्याची क्रिया, कला, युक्ती म्हणजेच पातंजल योग! (''योगश्चित्तवृत्तिनिरोधः'' - पा. सू. १.२). संकल्प-विकल्प ज्यांतून स्रवतात त्या मनाची एकाग्रता साधावी, आणि परमेश्वराच्या भक्तीत ती दृढ करावी (''ईश्वरप्रणिधानाद्वा'' - पा. सू. १.२३) म्हणजे हा योग कल्याणकारक व सुखदायक होईल. शेवटी बन्ध-मोक्षाला कारण हे मनच आहे. चंचल व अस्थिर मन जेथून बाहेर पडेल तेथून तेथून त्याचे नियमन करून त्याला आत्म्याच्या ताब्यात आणावे. ज्ञानेश्वरांनी एकाच ओवीत हा भाव समर्थपणे मांडला आहे. ते म्हणतात,

**मग मोकलिले जेथ जेथ जाईल ।**
**तेथूनि नियमुचि घेऊनि येईल ।**
**ऐसेनि स्थैर्याची होईल । सवे यया ।।३८२।।**

''मन मोकळे सोडले असता ते जेथे जाईल, तेथून नियमच त्यास परत घेऊन येईल. अशा रीतीने यालाही स्थैर्याची सवय होईल.''

आत्मस्वरूपी चित्त लयाला गेले की संपूर्ण विश्वच चैतन्यमय होते. जेव्हा मन स्वतः आत्मस्वरूप होईल तेव्हा द्वैतच नाहीसे होईल व ही स्थिती प्राप्त झाल्यावर योग्याचे-साधकाचे जीवन कसे दिव्य, भव्य बनते त्याचे वर्णन २९ ते ३२ ह्या श्लोकांत केले आहे. हे चारही श्लोक सुंदर आहेत. निर्विकल्प समाधीची स्थिती अनुभवल्यानंतर जगाकडे पाहण्याची दृष्टी, वृत्ती कशी होते त्याचे हे वर्णन आहे.

**सर्वभूतस्थमात्मानं सर्वभूतानि चात्मनि ।**
**ईक्षते योगयुक्तात्मा सर्वत्र समदर्शनः ।।२९।।**
**यो मां पश्यति सर्वत्र सर्वं च मयि पश्यति ।**
**तस्याहं न प्रणश्यामि स च मे न प्रणश्यति ।।३०।।**
**सर्वभूतस्थितं यो मां भजत्येकत्वमास्थितः ।**
**सर्वथा वर्तमानोऽपि स योगी मयि वर्तते ।।३१।।**
**आत्मौपम्येन सर्वत्र समं पश्यति योऽर्जुन ।**
**सुखं वा यदि वा दुःखं स योगी परमो मतः ।।३२।।**

''ज्याचा आत्मा (याप्रमाणे) योगयुक्त झाला त्याची दृष्टी सर्वत्र सम होऊन



सर्व भूतांच्या ठायी आपण आणि आपल्या ठायी सर्वभूते (आहेत) असे त्याला दिसू लागते.'' ।।२९।।

''मी (परमेश्वर, परमात्मा) सर्व ठिकाणी आहे असे जो पाहतो आणि माझ्या ठायी सर्व अशी ज्याची दृष्टी झाली, त्याला मी कधी अंतरत नाही, तोही मला कधी अंतरत नाही.'' ।।३०।।

''एकत्वबुद्धी म्हणजे सर्व भूतात्मैक्यबुद्धी मनात ठेवून सर्व भूतांत असणाऱ्या मला जो भजतो तो योगी सर्व प्रकारे वागत असताही माझ्याच ठिकाणी असतो.'' ।।३१।।

''हे अर्जुना, सुख असो वा दुःख असो, आपल्याप्रमाणे इतरांना अशा आत्मौपम्यदृष्टीने जो सर्वत्र सारखे पाहू लागला तो योगी परम म्हणजे श्रेष्ठ मानला जातो.'' ।।३२।।

ही अवस्था म्हणजे भक्तीची परमोच्च स्थिती! सर्व ठिकाणी एकत्व पाहण्याची अद्वैत दृष्टी!! देहतादात्म्य जाऊन 'आपणचि विश्व जाहला' अशी समदृष्टी प्राप्त झालेली दिव्य अनुभूती!!!

सर्व संतांनी व वेद, उपनिषदांनी वर्णिलेली ही ब्राह्मीस्थिती ज्याला प्राप्त होते, तो प्रत्यक्ष परब्रह्मच!

**जे जे भेटे भूत । ते ते मानिजे भगवंत ।**
**हा भक्तियोगु निश्चित । जाण माझा ।।११८।।** (ज्ञाने. अ.१० वा)

''जो जो प्राणी दिसेल तो तो प्रत्यक्ष परमात्मा आहे, असे समजावे. हाच माझा भक्तियोग आहे, असे निश्चित समज.'' - ज्ञानेश्वर महाराजांनी ही अवस्था अशी वर्णिली तर तुकाराम महाराजांना जग असे दिसले -

**विष्णुमय जग वैष्णवांचा धर्म ।**
**भेदाभेद भ्रम अमंगळ ।।**

सर्वेश्वर पूजनाचे हेच वर्म आहे, असे ते सांगतात. अशी स्थिती प्राप्त झाली की मग -

**''आनंदाचे डोही आनंद तरंग ।**
**आनंदची अंग आनंदाचे ।।''**

ईशावास्योपनिषदाच्या पहिल्याच मंत्रात, हे जग ईश्वराने कसे भरलेले आहे, याचे सुंदर वर्णन आहे -

**ईशावास्यमिदं सर्वं यत्किञ्च जगत्यां जगत् ।**
**तेन त्यक्तेन भुञ्जीथा मा गृधः कस्य स्विद् धनम् ।।१।।**

हे एक श्रेष्ठतम असे उपनिषद आहे. केवळ १८ श्लोकांच्या ह्या उपनिषदात अशाच अर्थाचे आणखी दोन श्लोक आहेत. तेही समजून घेण्यासारखे आहेत -

**यस्तु सर्वाणि भूतान्यात्मन्येवानुपश्यति ।**
**सर्वभूतेषु चात्मानं ततो न विजुगुप्सते ।।६।।**

**यस्मिन् सर्वाणि भूतान्यात्मैवाभूद् विजानतः ।**
**तत्र को मोहः कः शोक एमत्वमनुपश्यतः ।।७।।**

गीता हे उपनिषदांचेच सार आहे. हाच विचार उपनिषदांत कसा व्यक्त झाला आहे हे समजण्यासाठीच वरील तीन मंत्रांचे अवतरण दिले आहे. ईश्वराशी तादात्म्य पावणारी दृष्टी कशी असते याचे हे वर्णन आहे. सर्व भूतांच्या ठिकाणी प्रभू पाहणे व त्या परमात्म्यात, सर्व भूते पाहणे ही दृष्टी येताच सर्व ठिकाणी हरिदर्शन होते. सर्व भूतांचे ठिकाणी आत्म्याला, शुद्ध चैतन्याला, भगवंताला पाहणे हेच आत्मज्ञान व भगवंताच्या ठिकाणी सर्व भूते पाहणे ह्याचे नाव भक्ती. ह्या दोन्हीही गोष्टी ज्या साधकाजवळ असतील तोच ज्ञानी भक्त. ही दृष्टी येताच विश्वातल्या अणू-परमाणूवर, भूतमात्रांवर, सर्व पदार्थांवर प्रेम जडते. सर्वच आत्मस्वरूप झाल्यावर मग अशा योग्याला शोक, मोह काही उरत नाही. ही दृष्टी येण्यासाठी अध्यात्माची कास धरावी लागते. ही दृष्टी प्राप्त करण्यासाठी वासना, विकार, भोग, अहंकार, 'मी', 'माझे'पण, या सर्वांचे संयमन व मनाचा निग्रह करून ह्या सर्वात्मक ईश्वराची भक्ती करायची असते. हेच योगाचेही सार आहे. स्वतःमध्येच अनंत आनंदाची खाण आहे, ह्याची प्रचीती ही दृष्टी प्राप्त झाल्यानंतर येते. पण व्यवहारात हे सर्व विधान पुष्कळ लोकांना आभासात्मक, कल्पनात्मक, काव्यमय वाटते. गीतेची ही 'आत्मौपम्य' दृष्टी खरेच येऊ शकते का, अशी शंका बाहेरच्या जगात वावरताना खचित येते. याचे कारण आपले अज्ञान म्हणजे ह्या जगात भेदाभेदाची, नानात्वाची, बहुत्वाची जाणीव. उपनिषदे, गीता सांगते की हा भेद वस्तुतः अस्तित्वात नाही. हे वरवर भासणारे भेदाभेद आहेत. अविद्या, अज्ञान याचा पडदा दूर झाल्यानंतर जे ज्ञान होते; त्याप्रमाणे वस्तूच्या अंतःस्थळी, त्याच्या अंतर्यामात, गाभ्यात अभेदच विद्यमान आहे, हे आढळून येईल. सर्व काही त्या एकाच आत्मतत्त्वाची भिन्न भिन्न रूपे आहेत, ह्याचा बोध झाल्यानंतर मग शोक, मोह, वासना, भय यांचे अस्तित्व उरेलच कसे? 'मी'च जर 'सर्व' आहे, तर शोक कशासाठी? आणि भय कोणापासून? सर्व वस्तूमागील एकत्व - नित्य सत्, नित्य चित्, नित्य आनंद फक्त यांचाच अनुभव शिल्लक राहतो. त्या सत्याचा, त्या अखंड चिदानंदाचा लाभ झाल्यावर तो योगी भगवत्स्वरूप होतो. अशा योग्याची दृष्टी हीच आत्मौपम्य दृष्टी!

हे सर्व ऐकून अर्जुनाच्या मनात शंका उपस्थित झाली आहे. ही आत्मौपम्यदृष्टी ज्या मनाने साधायची आहे, ते मन चंचल असल्यामुळे ते दुरापास्त आहे, असे तो म्हणतो.

**चञ्चलं हि मनः कृष्ण प्रमाथि बलवद् दृढम् ।**
**तस्याहं निग्रहं मन्ये वायोरिव सुदुष्करम् ।।३४।।**

''हे कृष्णा! मन हे चंचल, दांडगे, बलिष्ठ व दृढ म्हणजे वळविण्यास कठीण



आहे. वाऱ्याप्रमाणे म्हणजे वाऱ्याची मोट बांधण्याप्रमाणे याचा निग्रह करणे मला अत्यंत दुष्कर दिसते.''

- हा प्रश्न अर्जुनाचा; पण तसा तुम्हां आम्हां सर्वांचाच. परमार्थाचा थोडा अभ्यास, साधना सुरू होताच हे मन काही केल्या स्थिर होत नाही. प्रपंचात, वासना-विकारात, इच्छा नसतानासुद्धा ओढले जाते. मोह-मायेत अडकते. मग असे मन योगसाधनेत स्थिर कसे करायचे. ह्या मनाविषयी ज्ञानेश्वर माऊली अर्थपूर्ण शब्दात म्हणते,

**हे मन कैसे केवढे । ऐसे पाहो म्हणो तरी न सापडे ।**
**एऱ्हवी राहाटावया थोडे । त्रैलोक्य यया ।।४१२।।**
**म्हणौनि ऐसे कैसे घडेल । जे मर्कट समाधी घेईल ।**
**का राहे म्हणतलिया राहेल । महावातु ।।४१३।।**

''हे मन कसे व केवढे आहे याचा पत्ता लावू असे म्हटले तर सापडत नाही. एऱ्हवी मनाला वावरण्याला हे सर्व त्रैलोक्य अपुरे पडते. म्हणून हे असे कसे होईल की, 'माकडाला समाधी लाभेल.' किंवा सोसाट्याचा वारा 'थांब' म्हटल्यावर थांबेल काय?''

भगवंत उत्तर देतात,

**''असंशयं महाबाहो मनो दुर्निग्रहं चलम् ।**
**अभ्यासेन तु कौन्तेय वैराग्येण च गृह्यते ।।३५।।''**

''हे महाबाहो अर्जुना ! मन हे चंचल असून त्याचा निग्रह करणे दुर्घट, याबद्दल काहीच शंका नाही. पण अभ्यासाने आणि वैराग्याने हे कौन्तेया! ते स्वाधीन ठेवता येते.'' ।।३५।।

अभ्यास व वैराग्य ह्यांनी मनोनिग्रह करण्याचा प्रयत्न कर व मग ते स्थिर होते की नाही ह्याचा अनुभव घे, असा भगवंताचा उपदेश आहे. मनाचे एक वैशिष्ट्य असे की, त्याला ज्याची गोडी लावावी त्यात ते रमते. अशा मनाला हळूहळू उच्च, उदात्त विषयांची गोडी लावली की ते क्षुद्र गोष्टीत रमत नाही. ह्या मनाची ठेवणच अशी की ज्यात ह्याला सुख प्राप्त होते तिकडे त्याची धाव असते. ध्यान, योग, परमार्थ ह्यात सुख आहे याची प्रचीती मनाला द्यायची व त्याला हळूहळू वश करायचे नाहीतर हे बेलगाम, वढाळ जनावरासारखेच!

परमार्थात एकदा अभ्यास सुरू केल्यावर तो पुरा करण्याच्या अगोदरच जर मध्ये मृत्यू आला तर मग आमची अवस्था काय होणार? योगापासून चलित झालेला असा साधक नाश तर पावत नाही ना? असा प्रश्न अर्जुन ३७ ते ३९ ह्या श्लोकांत विचारतो. हे श्लोक असे -

**अयतिः श्रद्धयोपेतो योगाच्चलितमानसः ।**
**अप्राप्य योगसंसिद्धिं कां गतिं कृष्ण गच्छति ।।३७।।**

**कच्चिन्नोभयविभ्रष्टश्छिन्नाभ्रमिव नश्यति ।**
**अप्रतिष्ठो महाबाहो विमूढो ब्रह्मणः पथि ।।३८।।**
**एतन्मे संशयं कृष्ण छेत्तुमर्हस्यशेषतः ।**
**त्वदन्यः संशयस्यास्य छेत्ता न ह्युपपद्यते ।।३९।।**

अर्जुन म्हणाला - "हे श्रीकृष्णा! एखाद्याने श्रद्धेने योगाभ्यासाला सुरुवात केली पण पुरेसे प्रयत्न न झाल्यामुळे अंतकाली योगापासून मन ढळले, तर त्याला योगात पूर्ण सिद्धी न पावता तो कोणत्या गतीला जातो?" ।।३७।।

"हे महाबाहो! मोहग्रस्त होऊन ब्रह्मप्राप्तीच्या मार्गात स्थिर न झाल्याने दोहोंकडून भ्रष्ट म्हणजे सुटलेला हा पुरुष फुटलेल्या ढगाप्रमाणे (मधल्यामध्येच) नाश तर पावत नाही ना?" ।।३८।।

"हे कृष्णा! माझी ही शंका पूर्णपणे तुम्हीच निरसन केली पाहिजे. कारण सर्वज्ञ अशा तुमच्याशिवाय दुसरा कोणीही हा संशय दूर करू शकणार नाही." ।।३९।।

अर्जुनाचा प्रश्न हा प्रातिनिधिक प्रश्न आहे. "बहुनां जन्मनां अंते ज्ञानवान् मां प्रपद्यते ।" अनेक जन्मानंतर ज्ञानवान येऊन मला मिळतात, असे भगवंत पुढील अध्यायात सांगणार आहेत. पण तत्पूर्वी, अर्जुनाने हा साधनमार्गातील प्रश्न विचारला. या जन्मात केलेला अभ्यास वाया जात नाही. पुढच्या जन्मात ही साधना चालू राहते. पुढच्या जन्मात असा साधक शुचिश्रीमान होऊन आपली राहिलेली साधना पूर्ण करतो. जीवनात सर्व कर्मे आत्मविकासासाठी करून, भगवंताच्या चरणी समर्पित केल्यामुळे, भगवंत त्याला राहिलेली साधना, पूर्ण करण्यासाठी ही व्यवस्था करतो. भगवंताचे हे आश्वासन आहे. हाही प्रश्न आपणा सर्वांचा! भगवंतांनी जे उत्तर दिले आहे ते उत्साहवर्धक असे आश्वासनाचे आहे. अर्जुनाबरोबर प्रत्येक साधकाला पडणाऱ्या शंकेचे समाधान त्यात आहे.

**पार्थ नैवेह नामुत्र विनाशस्तस्य विद्यते ।**
**न हि कल्याणकृत्कश्चित् दुर्गतिं तात गच्छति ।।४०।।**

"हे पार्था! इहलोकी काय आणि परलोकी काय अशा पुरुषाचा कधीच विनाश होत नाही. कारण कल्याणकारक कर्मे करणाऱ्या कोणत्याही पुरुषास अर्जुना! दुर्गती मिळत नाही." ।।४०।।

अशा पुरुषाला कोणती गती मिळते तेही ते पुढील श्लोकात प्रतिपादितात.

**"प्राप्य पुण्यकृतां लोकानुषित्वा शाश्वतीः समाः ।**
**शुचीनां श्रीमतां गेहे योगभ्रष्टोऽभिजायते ।।४१।।**

"पुण्यकर्मे करणाऱ्या पुरुषांना मिळणाऱ्या (स्वर्गादी) लोकांप्रत पोहोचून व (तेथे) पुष्कळ वर्षे वास करून मग हा योगभ्रष्ट झालेला पुरुष शुचिर्भूत श्रीमान लोकांच्या घरी जन्म घेतो." "बुद्धिमान किंवा अशा योग्याच्या कुळात जन्म पावतो आणि पूर्वजन्मातल्या ह्या संस्कारानुसार राहिलेली सिद्धावस्था प्राप्त



करण्यासाठी प्रयत्न करतो." ।।४१।।

सहाव्या अध्यायाच्या शेवटच्या दोन श्लोकांत भगवंत, सर्वांत उत्तम योग्याची, भक्ताची व्याख्या करतात -

**तपस्विभ्योऽधिको योगी ज्ञानिभ्योऽपि मतोऽधिकः ।**
**कर्मिभ्यश्चाधिको योगी तस्माद्योगी भवार्जुन ।।४६।।**
**योगिनामपि सर्वेषां मद्गतेनांतरात्मना ।**
**श्रद्धावान्भजते यो मां स मे युक्ततमो मतः ।।४७।।**

"तपस्वी लोकांपेक्षा योगी श्रेष्ठ, ज्ञानी पुरुषांपेक्षाही श्रेष्ठ, आणि कर्मीपेक्षाही श्रेष्ठ असे मी समजतो. म्हणून हे अर्जुना! तू योगी हो."

"तथापि सर्व योग्यांमध्येही जो माझ्या ठिकाणी अंतःकरण ठेवून श्रद्धेने मला भजतो, त्यालाच मी 'सर्वात अधिक युक्त' म्हणजे सर्वोत्तम प्रकारचा योगी मानतो."

भगवंताला भक्त आवडतो. कारण भक्तीत कर्म, ज्ञान व भक्ती ह्या तिहींचा समन्वय साधला जातो. असा योगी भक्त भगवंताचा आवडता होतो.

गीता हे अध्यात्मशास्त्र आहे. १ ते ६ अध्यायांअखेर कर्मयोग सांगितला आहे. यात 'त्वं' पदाचे म्हणजे जीवाचे स्वरूप सांगितलेले आहे. जीव वस्तुतः परब्रह्मच आहे. अशा जीवाने 'स्व'स्वरूप जाणून घेण्यासाठी कर्म, यज्ञ, योग, संन्यास इ. पायऱ्या समजून घेतल्या पाहिजेत. म्हणून १ ते ६ अध्यायांचे प्रयोजन!

**।।श्रीकृष्णार्पणमस्तु ।।**

## अध्याय सातवा
## ज्ञान-विज्ञानयोग

गीता मंदिराची सहा दालने आपण पार केली. आता सातव्या दालनात प्रवेश करत आहोत. गीता-ग्रंथरूपी मंदिरात जो श्रद्धेने, प्रेमाने प्रवेश करतो, तो त्यातील ज्ञानरूपी पायऱ्या जाणण्यास पात्र होतो. जो श्रद्धेने येतो त्याला ज्ञान प्राप्त होते हे आपण चौथ्या अध्यायात पाहिले.

**श्रद्धावांल्लभते ज्ञानं...** (श्लोक ३९)

ह्या श्रद्धेबरोबरच 'अत्यंत प्रेमाने' जे सतत माझ्या अनुसंधानात राहतात त्यांना मी जीव-ब्रह्मैक्याचे ज्ञान आणि बुद्धियोग देतो व ते माझ्या स्वरूपाला प्राप्त होतात, असे भगवान श्रीकृष्णांनी दहाव्या अध्यायात आपल्याला ठोस आश्वासन दिले आहे.

**तेषां सततयुक्तानां भजतां प्रीतिपूर्वकम् ।**
**ददामि बुद्धियोगं तं येन मामुपयान्ति ते ।।१०।।**

सगुण साकार श्रीकृष्ण हा पूर्णावतार आहे. त्याने सांगितलेल्या भगवद्गीतेतील तत्त्वज्ञानाचा आपल्या जीवनात आपण शरणागतीच्या भावाने जर स्वीकार केला तर या प्रत्येक दालनातून जाताना आपल्याला आपल्या कल्याणाचे दरवाजे उघडल्याशिवाय राहणार नाहीत. श्रद्धा व अहेतुक, निरतिशय प्रेम हे दोन गुण आत्मसात करूनच ह्या मंदिरात प्रवेश करावयाचा आहे. हे आत्मकल्याणाचे निधान आहे. गीता हा जीवनग्रंथ आहे. माझ्या जीवनात सुगंध येण्यासाठी मला ह्या मंदिरात यायचे आहे, ही जीवनदृष्टी असेल तरच गीताज्ञान-यज्ञाचा आपल्याला लाभ होईल. असा शुद्ध भाव सहजासहजी येणार नाही. ही अनन्यता येण्यासाठी साधनेची नितांत आवश्यकता आहे. गीता विचारांचे सतत, चिंतन, मनन, ध्यास हे त्या साधनेचे एक अंग! गीता-मंदिरात शुद्ध अंतःकरणाने वावरायचे आहे. तत्त्वज्ञान केवळ अभ्यासासाठी नसून जीवनात उत्तम परिवर्तन घडविण्यासाठी आहे. मंदिरात येऊन मी जर बदलणार नसेन तर इतर ग्रंथांचा जसा अभ्यास होतो, तसाच हा गीताभ्यास होईल. ते केवळ शब्दज्ञान राहील. आचरणात आणले तरच ते अर्थपूर्ण होईल. गीता हे फक्त अध्यात्मशास्त्रच नाही तर ते जीवनशास्त्र आहे.



आतापर्यंत पहिल्या सहा अध्यायाचे आपण चिंतन केले आहे. आता पुढील सहा अध्यायांच्या दालनात प्रवेश करतो आहोत. ह्या सहा अध्यायांत भगवंतांनी भक्तीचे फार मोठे दालन उघडले आहे. कर्म, भक्ती व ज्ञान ह्यांचा समन्वय त्यात झाला आहे.

या अध्यायाचे नाव आहे 'ज्ञान-विज्ञानयोग'. पहिल्या सहा अध्यायांत अर्जुन काहीतरी प्रश्न विचारतोय किंवा आपली मनोभूमिका तरी व्यक्त करतोय. पण ह्या अध्यायात केवळ भगवंतच बोलतात. अर्जुनावरील गाढ प्रेमाने, त्याच्यावर अनुग्रह करून त्याला ज्ञान-विज्ञान समजावतोहेत. ह्या 'ज्ञान-विज्ञान' शब्दाची व्याख्या श्री ज्ञानदेव माऊली अशी करतात...

**जैसी जाणीव जेथ न रिघे । विचार मागुता पाउली निघे ।**
**तर्कु आयणी नेघे । आंगी जयाचा ।।५।।**
**अर्जुना, तया नाव ज्ञान । येर प्रपंचु हे विज्ञान ।**
**तेथे सत्यबुद्धि ते अज्ञान । हेही जाण ।।६।।**

"त्याप्रमाणे जेथे बुद्धीचा प्रवेश होत नाही व विचार जेथून मागे फिरतो आणि ज्याच्या संबंधाने तर्काचे चातुर्य चालत नाही, अर्जुना, त्याचे नाव ज्ञान होय. याहून दुसरा जो प्रपंच ते विज्ञान आहे. आणि प्रपंचाच्या ठिकाणी खरेपणाची जी बुद्धी तिला अज्ञान म्हणतात हेही तू समज."

ज्ञान, विज्ञान, अज्ञान ह्यांची ही अतिशय सुटसुटीत, सोपी अशी व्याख्या! अर्जुन योगज्ञानाने युक्त झाला आहे. भगवंताचे स्वरूप-ज्ञान होणे आता बाकी आहे. इंद्रिये, मन, बुद्धी ही जड असल्याने ब्रह्मज्ञान होण्यासाठी जी पात्रता आणायची आहे त्याचे रहस्य भगवंतांना ह्या अध्यायात सांगायचे आहे. अज्ञान कसे नाहीसे होईल, प्रपंच कसा बाधित होईल आणि ज्ञान कसे प्राप्त होईल, याचे गूढ मर्म भगवंत या अध्यायात विशद करणार आहेत.

सहा अध्यायापर्यंत 'त्वम्' म्हणजे 'जीव' याचा सविस्तर विचार झाला. जीव मूलतः, वस्तुतः, स्वभावतः परब्रह्मच आहे. जीवाने हे स्वस्वरूप जाणून घेण्यासाठी कर्म, यज्ञ, संन्यास व योगाचे आचरण कशा पद्धतीने करावे यासाठी पहिल्या सहा अध्यायांचे दालन. या दालनातील शेवटची श्लोकरूपी पायरी म्हणजे ४७ वा श्लोक.

**योगिनामपि सर्वेषां मद्गतेनान्तरात्मना ।**
**श्रद्धावान्भजते यो 'मां' स मे युक्ततमो मतः ।।** (६/४७)

सातव्या अध्यायाचे सूतोवाच या श्लोकात केले आहे. सहाव्या अध्यायात ध्यानयोग चित्तैकाग्रता वगैरे समजावून सांगितली. पण हे ध्यान कोणाचे करायचे? त्याचे नेमके स्वरूप काय? या अनुत्तरित प्रश्नांची उत्तरे देण्यासाठीच सातव्या

अध्यायाचे प्रयोजन म्हणून वरील श्लोकातील 'माम्'चे म्हणजे परब्रह्माचे स्वरूप आता भगवंत स्वतःच सांगताहेत. जीव, जगत्, जगदीश्वराचे ज्ञान झाल्याशिवाय भक्ती रसमय, फलद्रूप होणार नाही. भक्त ज्या पायरीवर असेल, जेवढा त्याचा विकास झालेला असेल, तितकेच फळ त्याला मिळते. चौथ्या अध्यायात ह्याची चर्चा आपण केली आहे.

**ये यथा मां प्रपद्यन्ते तांस्तथैव भजाम्यहम्** ।। (४.११)

जशी आपली उपासना तसा आपला भगवंत. जेवढा आपला विकास तेवढाच आपला परमेश्वर. म्हणून अधिकाधिक उन्नत होण्यासाठी भक्तीचे हे मर्म समजावले आहे. जसा भाव तसा देव! तामसी प्रवृत्तीच्या भक्तांचा देवही तामसी! जो जे खातो, पितो तेच तो भगवंताला देतो. मी सहकुटुंब एकदा उज्जैनीला गेलो होतो. कोणीतरी सांगितले की, गावाबाहेर एक प्रसिद्ध मंदिर आहे. त्या मंदिरातील देवाला मद्य व बर्फी ह्याचाच प्रसाद चालतो. कुतूहलाने आम्ही सर्वजण तिथे गेलो. अनेक भक्तांकडून देवाला मद्य दिले जात होते. बशीत मद्य भरले जायचे, ते देवाच्या ओठापर्यंत न्यायचे व तिथपर्यंत नेले की नाहीसे व्हायचे. मी मागून पुढून त्या मूर्तीची कसून पाहणी केली. पण ती दारू कुठे जाते याचा मला तरी काही तपास लागला नाही. त्यातले गूढ तंत्र जाणून घ्यायची मला आजही उत्सुकता आहे. अशा प्रकारचे चमत्कार, अंधश्रद्धा या गोष्टी गीता-ज्ञानाने बिलकूल राहत नाहीत. असो. अशी नानाविध देव-देवतांची पूजा-अर्चा आपापल्या भावाप्रमाणे चाललेली असते. हे सर्व पाहिले की भक्ती कोणाची करायची? कशी करायची? त्या भगवंताला नेमके काय आवडते? तो आहे तरी कसा? त्याचे गुण कोणते? अशा प्रश्नांची उत्तरे भगवंतांनी या अध्यायातून दिली आहेत. भक्त व भगवंत यातील अंतर कमी व्हायचे असेल तर भक्तांनी भगवंतमयच व्हायला हवे. ''देवो भूत्वा देवं यजेत् । कृष्णो भूत्वा कृष्णं यजेत् ।'' कृष्ण होऊन म्हणजे कृष्णाचा एक-एक गुण घेत आपला विचार-भाव उन्नत करायचा. हीच साधना. अशी साधना होत असतानाच हे अंतर कमी कमी होत जाईल. यासाठी भगवंत जसा शुद्ध, विकाररहित, वासनारहित, अहंकारशून्य, संकल्परहित, ज्ञानी आहे तसे आपले स्वरूप व्हावयास पाहिजे. तसे होण्यासाठी साधकांनी कशी कर्मे करावीत याचा विचार पुढील सहा अध्यायांत केला आहे. आत्मशुद्धी हा परमार्थाचा पाया आहे. दिवसेंदिवस हा जीव शुद्ध होण्यासाठी आपल्यातील हिणकस भाग काढून टाकायचा आहे, म्हणून सतत परिवर्तनाची प्रक्रिया भक्तीत झाली पाहिजे. मी आहे तसाच राहणार व गीतेचा अभ्यास करणार. असे जर घडले तर तो अभ्यास व्यर्थ, निष्फळ. हा बदल प्रयत्नपूर्वक करणे म्हणजेच भक्ती! अशा भक्तीचा विचार या सहा अध्यायांत झाला आहे. म्हणून त्याचे महत्त्व!



गीता हे उपनिषदांचे सार असल्यामुळे वैदिक सत्यतत्त्वांचे, महावाक्यांचे निरूपण येणे हे स्वाभाविक आहे. ''तत् त्वं असि'' (छा. उप. ६.९.४) या महावाक्याचा अर्थ असा - 'ते तू आहेस.' तत् - परब्रह्म, त्वं - जीव, असि- आहेस. पहिल्या सहा अध्यायांत यातील 'त्वं' म्हणजे जीवाचे महत्त्व विशद करून सांगितले. ७ ते १२ व्या अध्यायापर्यंत 'तत्' म्हणजे परब्रह्माचे विवरण आहे. ते 'उपदेश वाक्य' म्हणजे सर्व उपनिषदादि धर्मशास्त्रांचे व तत्त्वज्ञानाचे सारभूत मंत्रवाक्य आहे. या तीन शब्दांवर खूप भाष्ये झाली आहेत, होताहेत. 'आत्मतत्त्व' या ब्रह्मांडात 'एकमेवाद्वितीयम्' (छा. उप. ६.२.१) असे आहे. हे तत्त्व जरी विविध रूपांनी नटलेले असले तरी त्यातील तत्त्व हे एकच आहे. जीव प्रत्यक्ष परब्रह्मच आहे. पण अज्ञान, अविद्या, विकार, वासना यांमुळे शोकमय झाला आहे. परमात्म्यापासून जीवात्मा वेगळा जरी असला तरी तो मूलतः परमात्म्याचाच अंश! देहतादात्म्यामुळे तो देहाची दुःखे आपलीच म्हणू लागतो व तृष्णाग्रस्त व दुःख होतो. पण ध्यानाने, भक्तीने जेव्हा जीवात्म्याला, सोऽहं 'मी तोच आहे.' असा स्वात्मबोध होतो तेव्हा तो शरीरात असूनदेखील जीवन्मुक्त होतो. अशा पुरुषांची कर्मे दिव्य बनतात. प्रसन्नता हा त्यांना प्रसाद लाभतो. 'आनंदाचे डोही आनंद तरंग' अशी त्यांची अवस्था होते. मन, बुद्धी संपूर्णपणे शुद्ध झाल्यामुळे सत्यतत्त्वाचा त्यांना साक्षात्कार घडतो. 'त्वं' पद 'तत्'शी एकरूप होते. त्या 'एकमेवाद्वितीयम्'पर्यंत पोचण्यासाठी त्याला जाणून घ्यायचे आहे. ''श्रद्धावान भजते यो मां...'' मधील 'माम्' म्हणजेच 'तत्'! ह्याला जाणून घेण्यासाठी 'ज्ञान-विज्ञान' भगवंत स्वतःच समजावताहेत.

ह्यातील पहिले तीन श्लोक पूर्वपीठिका समजावून देणार आहेत. ते असे -

**मय्यासक्तमनाः पार्थ योगं युञ्जन्मदाश्रयः ।**
**असंशयं समग्रं मां यथा ज्ञास्यसि तत् शृणु ।।१।।**
**ज्ञानं तेऽहं सविज्ञानमिदं वक्ष्याम्यशेषतः ।**
**यज्ज्ञात्वा नेह भूयोऽन्यज्ज्ञातव्यमवशिष्यते ।।२।।**
**मनुष्याणां सहस्त्रेषु कश्चिद्यतति सिद्धये ।**
**यततामपि सिद्धानां कश्चिन्मां वेत्ति तत्त्वतः ।।३।।**

''हे पार्था! माझ्या ठिकाणी चित्त ठेवून व माझाच आश्रय करून योग आचरित असता तुला माझे यथार्थ म्हणजे ज्या प्रकारे अथवा विधीने पूर्ण व निःसंशय ज्ञान होईल ते ऐक.' ।।१।।

''विज्ञानासहित हे ज्ञान काही शेष न ठेविता मी तुला सांगतो. जे जाणल्याने या लोकी पुन्हा दुसरे काही जाणावयाचे शिल्लक राहत नाही.'' ।।२।।

''हजारो मनुष्यात एखादाच सिद्धी मिळविण्याचा यत्न करतो आणि प्रयत्न करणाऱ्या या सिद्ध पुरुषांपैकी एखाद्यासच माझे खरे ज्ञान होते.'' ।।३।।

पहिल्या श्लोकात ईश्वरप्राप्तीसाठी भक्ताला तीन गोष्टींची आवश्यकता असल्याचे भगवंत प्रतिपादितात. 'मय्यासक्तमनाः', 'मदाश्रयः', 'योगं युञ्जन्' या तीन गोष्टी असतील तर भक्त व भगवंत यांच्यातील अंतर कमी होईल.

**भक्त म्हणिजे विभक्त नव्हे । विभक्त म्हणिजे भक्त नव्हे ।।** (दासबोध)

ही विभक्तता जायची असेल तर भगवंताविषयी प्रेम, आसक्ती वाटली पाहिजे. मन पूर्णतः अर्पण केले असले पाहिजे. ज्याने केवळ ईश्वराचाच आश्रय घेतला आहे, जो सर्वस्वी 'श्रीकृष्णःशरणं मम' ह्या भावनेने शरणागत झाला आहे, ईश्वर हेच माझ्या सुखाचे निधान आहे, ह्यासाठी धन, प्रतिष्ठा, कीर्ती इ. चा आश्रय करण्याची गरज नाही, अशी ज्याची दृढ धारणा झाली आहे तो साधक चित्तैकाग्र्य करून भगवंताशी पूर्णपणे जोडला जातो. तो विभक्त असू शकत नाही. ईश्वराशी जोडले जाण्यामध्ये या तिन्ही गोष्टी भक्तास असणे अनिवार्य आहेत. 'भक्ती ही सुळावरील पोळी'च आहे. हे तुकारामांचे विधान इथे पटते. थोडी अधिक भक्ती सुरू केल्यानंतर 'मला तांबडा-पांढरा प्रकाश दिसायला लागला, भगवंताचे दिव्य रूप स्वप्नात पाहिले, भूत-भविष्याचे ज्ञान व्हायला लागले,' अशी उतावीळपणाने आपली नसलेली प्रगती सांगणाऱ्यांसाठी, भगवंतांनी या श्लोकांतून पूर्ण जाणीव करून दिली आहे. या श्लोकांत सांगितलेल्या तिन्ही गोष्टी जीवनामध्ये आल्यानंतरच पूर्ण व निःसंशय ज्ञान होईल. जे जाणल्याने जाणायचे दुसरे काही शिल्लकच राहणार नाही.

छांदोग्य उपनिषदामध्ये आरुणीचा मुलगा श्वेतकेतू गुरुगृही राहून जेव्हा परत आला तेव्हा बापाने त्याला विचारले -

**''केनाश्रुतं श्रुतं भवति, अमतं मतं, अविज्ञातं विज्ञानमिति।।''**

(छा.उप.६.१.३)

''कोणते तत्त्व समजल्याने न ऐकलेली गोष्ट ऐकल्यासारखी होते, विचारहीन मत असलेल्यांचे सुविचारित मत होते, न जाणलेली गोष्टी जाणल्यासारखी होते?''

या प्रश्नाचे उत्तर श्वेतकेतूला न देता आल्यामुळे बापाने त्याला ब्रह्मविद्या सांगितली. इथेही भगवंत असेच ज्ञान अर्जुनाला सांगतात.

भगवंताला तत्त्वतः जाणणारा विरळाच! हजारो लोकांमध्ये एखादाच मनुष्य ज्ञानाच्या सिद्धीकरिता प्रयत्न करतो व अशा प्रयत्न करणाऱ्या सिद्धलोकांपैकी एखादाच मनुष्य ईश्वराला तत्त्वतः जाणतो.

ह्या तत्त्वासंबंधी विशद विवेचन भगवंत या अध्यायातील पुढील श्लोकात आणि त्यानंतरच्या अध्यायांतही करतात. अकराव्या अध्यायात तर अर्जुनाला दिव्य दृष्टी देऊन आपले विश्वरूपाचे चाक्षुष दर्शनही ते करून देतात. असे दर्शन सर्वांना होणे शक्य नसते, पण ज्ञानाने तत्त्व जाणता येते. ज्ञानी भक्त जे जे पाहतात, त्यात त्यांना ईश्वराचे रूपच दिसते.



**नरनारी बाळे अवघा नारायण ।**
**ऐसे माझे मन करी देवा।।** - तुकाराम

एकच परमात्मा सर्वत्र नटलेला आहे, अशी त्या भक्ताची दृष्टी असते. अशी समदृष्टी प्राप्त झाल्यानंतर तो ईश्वरातच लीन राहून जीवन जगतो.

आता पुढील श्लोकांतून ह्या तत्त्वासंबंधीचे विस्तृत विवेचन भगवंत करताहेत.

**भूमिरापोऽनलो वायुः खं मनो बुद्धिरेव च ।**
**अहंकार इतीयं मे भिन्ना प्रकृतिरष्टधा ।।४।।**
**अपरेयमितस्त्वन्यां प्रकृतिं विद्धि मे पराम् ।**
**जीवभूतां महाबाहो ययेदं धार्यते जगत् ।।५।।**
**एतद्योनीनि भूतानि सर्वाणीत्युपधारय ।**
**अहं कृत्स्नस्य जगतः प्रभवः प्रलयस्तथा ।।६।।**
**मत्तः परतरं नान्यत्किंचिदस्ति धनंजय ।**
**मयि सर्वमिदं प्रोतं सूत्रे मणिगणा इव ।।७।।**

''पृथ्वी, पाणी, अग्नी, वायू, आकाश (ही पाच सूक्ष्म महाभूते) आणि मन, बुद्धी व अहंकार मिळून आठ प्रकारे विभागलेली ही माझी प्रकृती आहे.'' ।।४।।

''ही अपरा म्हणजे खालच्या प्रतीची प्रकृती झाली. हे महाबाहो अर्जुना! याशिवाय जिने या जगाचे धारण होते अशी परा म्हणजे याच्या पलीकडची श्रेष्ठ प्रतीची जीवस्वरूपी माझी दुसरी प्रकृती आहे असे समज.'' ।।५।।

''या दोहोंपासून सर्व भूते उत्पन्न होतात हे लक्षात असू दे. मीच सर्व जगताचे प्रभव म्हणजे मूळ व प्रलय म्हणजे शेवट आहे.'' ।।६।।

''माझ्याहून पलीकडचे हे धनंजया! दुसरे काहीही नाही. दोऱ्यात अनेक मणी ओवावे त्याप्रमाणे माझ्या ठायी हे सर्व ओवलेले आहे.'' ।।७।।

वेदान्ताचे असे म्हणणे आहे की, हे सर्व जड-चेतनात्मक जग परमेश्वराने आपल्या मायेने निर्माण केले आहे. परमेश्वराची ही माया परमेश्वराहून एखादी भिन्न किंवा स्वतंत्र वस्तू नसून ती परमेश्वराचीच अंगभूत शक्ती आहे. श्वेताश्वतर उपनिषदात तिला 'देवात्म-शक्ती' म्हणून संबोधिले आहे. (श्वे. उप. १.१.३) आणि माया म्हणजेच प्रकृती असा निर्वाळा दिला आहे.

**मायां तु प्रकृतिं विद्यात् मायिनं तु महेश्वरम् ।** (श्वे. उप. ४.४.१०)

(मायेला प्रकृती समजावी आणि महेश्वराला मायापती समजावे.)

येथे गीतेच्या सातव्या अध्यायात, भगवंतांनी आपल्या प्रकृतीची खालील दोन रूपे सांगितली आहेत. पहिले रूप म्हणजे पाच सूक्ष्म महाभूते, मन, बुद्धी व अहंकार अशी आठ प्रकारे विभागलेली 'अपरा' प्रकृती. ती जड व परिवर्तनशील असल्याने तिला 'अपरा' म्हणजे जवळची अर्थात कनिष्ठ पायरीची असे म्हणतात.

गीतेत नवव्या अध्यायामध्ये व अन्य अनेक ठिकाणी तिला केवळ प्रकृती म्हणून, तेराव्या अध्यायामध्ये तिला 'क्षेत्र' म्हणून आणि पंधराव्या अध्यायामध्ये तिला 'क्षर पुरुष' (विनाशशील पुरुष) असेही संबोधिले आहे.

प्रकृतीचे दुसरे रूप म्हणजे 'परा' प्रकृती. ती चेतनात्मक व अपरिवर्तनशील असल्याने तिला 'परा' म्हणजे पलीकडची अर्थात श्रेष्ठ पायरीची मानले आहे. चेतनात्मक असल्यामुळे तेराव्या अध्यायात तिला 'क्षेत्रज्ञ' आणि अविनाशी असल्यामुळे पंधराव्या अध्यायात तिला 'अक्षर पुरुष' असेही म्हटले आहे. या परा शक्तीलाच आपण आत्मा, जीवात्मा वा जीव म्हणतो. भगवंत म्हणतात की, या दोन प्रकृतींपासून (म्हणजे प्रकृती - पुरुष संयोगाने किंवा क्षेत्र-क्षेत्रज्ञ संयोगामुळे) सर्व स्थावर-जंगम सृष्टी उत्पन्न झाली. परंतु हे सृष्टिकार्य प्रकृतीकडून स्वतंत्रपणे होत नाही; प्रकृती ही परमेश्वराच्या अध्यक्षतेखालीच सृष्टि-रचनेचे कार्य करते.

**मयाध्यक्षेण प्रकृतिः सूयते सचराचरम् ।** (गीता ९.१०)

(माझ्या अध्यक्षतेखालीच प्रकृती समस्त चर-अचर जगाची निर्मिती करते.)

भगवंत म्हणतात की, हे सर्व व्यक्त जग अशा प्रकारे माझ्यापासूनच निर्माण होत आहे आणि शेवटी ते माझ्यातच विलीन होत आहे. 'प्रभव' व 'प्रलयाची' ही क्रीडा एका वर्तुळाप्रमाणे होत आहे आणि याचे एक सुंदर वर्णन आठव्या अध्यायात (गीता ८.१८, ८.१९) दिले आहे.

ते पुढे म्हणतात की, या जगात माझ्याहून पलीकडचे म्हणजे माझ्याहून पृथक् काहीही नाही. हारातील मणी जसे धाग्यात गोवले जातात तसे हे जग माझ्यात ओवले आहे. हारातील मणी दिसतात. धागा दिसत नाही. तसेच जग दिसते पण ईश्वर दिसत नाही. पण जे प्रकट आहे त्याचा आधार अप्रकट असा ईश्वरच आहे.

परा-अपरा प्रकृतीला धारण करणारी, जन्म-मृत्यू देणारी, प्रभव-प्रलय करणारी व ज्ञाता-ज्ञेय ह्यांच्या पलीकडे असणारी ही स्वतंत्र शक्ती म्हणजेच परब्रह्म! तेच सत्य!! अंतिम सत्य!!!... "सते हितं सत्यं ।" जे सतकडे घेऊन जाते ते सत्य.

भागवतात मंगलाचरणाच्या श्लोकामध्ये ह्या सत्य तत्त्वाचे सुंदर विवेचन आहे. कोणत्याही कार्याच्या प्रारंभी मनुष्याने ईश्वराचे स्मरण केले पाहिजे असा वैदिकांचा प्रघात. त्याला अनुसरून ह्या श्लोकात सत्यरूपी भगवंताचे स्मरण केले आहे. हा श्लोक तत्त्वज्ञानाचे जणू सारच आहे. परा-अपरा प्रकृती व विश्वनिर्मिती ह्या संदर्भात देखील हा श्लोक अपूर्व असल्यामुळे तो येथे उद्धृत करीत आहे -

**जन्माद्यस्य यतोऽन्वयादितरतश्चार्थेष्वभिज्ञः स्वराट्**
**तेने ब्रह्म हृदा य आदिकवये मुह्यन्ति यत्सूरयः ।**



**तेजोवारिमृदां यथा विनिमयो यत्र त्रिसर्गोऽमृषा**
**धाम्ना स्वेन सदा निरस्तकुहकं सत्यं परं धीमहि ।।** (भागवत १/१/१)

"ज्याच्यापासून अखिल विश्वाची उत्पत्ती, स्थिती, लय होतात, जो चराचर सृष्टीत व्याप्त असून त्याहून अगदी निराळा आहे, मोठमोठ्या प्रज्ञावंतांना मोह पाडणारे वेद ज्याने केवळ मनःसंकल्पाने आदिकवी ब्रह्मदेवाच्या मनात प्रकाशित केले. तेज, जल व मृत्तिका ह्यांचा एकमेकांच्या ठिकाणी होणारा भास वस्तुतः असत्य असताही अधिष्ठानाच्या सत्यतेमुळे जसा खरा वाटतो, त्याचप्रमाणे सत्त्व, रज, तम ह्या गुणत्रयीपासून उत्पन्न झालेली ही सृष्टी असत्य असताही तिच्या ठिकाणी ज्याची व्याप्ती असल्यामुळे ती सत्य भासते आणि जो नित्य स्वतःसिद्ध ज्ञानस्वरूप असल्याने अज्ञानजन्य मायेपासून अलिप्त आहे, अशा सत्यस्वरूप, सच्चिदानंद परमात्म्याचे मी ध्यान करतो."

"**सत्यं परं धीमहि ।**" जे सत्य आहे (Absolute Truth), जे श्रेष्ठ आहे त्याचे ध्यान करा. वेदव्यासांनी इथे कोणत्याही विशिष्ट सगुण रूपाचा आग्रह धरलेला नाही. कृष्णरूपाचा सुद्धा!! इतकी अनाग्रही भूमिका इथे वेदव्यासांनी घेतलेली आहे. कृष्णभक्तीचे माहात्म्य सांगणाऱ्या ह्या ग्रंथाच्या मंगलाचरणात परमात्म्याचे सत्य स्वरूप सांगणारा सिद्धांत मांडला आहे. विश्वाची उत्पत्ती, लय तसेच 'ब्रह्म सत्यं जगन्मिथ्या', त्रिगुणमयी माया व ती सत्य का भासते... अशा श्रेष्ठ तत्त्वांचा सुंदर मिलाफ ह्या एकाच श्लोकात झाला आहे. सातव्या अध्यायापासून ह्या सर्व तत्त्वांचा विस्तार होणार आहे. म्हणून तत्त्वज्ञानाचे सार सांगणारा हा श्लोक येथे उद्धृत केला.

गीतेने ईश्वरतत्त्वाची म्हणजेच सत्याची व्याख्या उत्तम केली आहे. आज बरेच तथाकथित बुद्धिमंत (किंवा बुद्धिवादी, बुद्धिजीवी म्हणू) पहिली दोन तत्त्वे मानतात. जड व चेतन किंवा अपरा-परा पण तिसरे म्हणजे चैतन्य तत्त्व मानायला ते तयार नाहीत. हे तत्त्व मानण्याची काही गरज आहे का? असा त्यांचा प्रश्न आहे. मार्क्सचा गुरू हेगेल ह्याच्या मते ह्या जड-चेतन तत्त्वापलीकडे ह्या दोघांनाही पकडू शकेल, नियंत्रित करू शकेल असे एक स्वतंत्र तत्त्व आहे व तेच सत्य होय. त्यालाच आपण 'परम सत्य', 'परब्रह्म', 'परतत्त्व', 'ईशतत्त्व', 'चैतन्य', 'सच्चिदानंद'... अशा विविध संज्ञांनी आवाहन करतो. संपूर्ण ब्रह्मांडाची रचना इतकी सुनियंत्रित, सुव्यवस्थित आहे की, त्याच्या पाठीमागे कोणीतरी बुद्धिमान सर्जक, व्यवस्थापक असलाच पाहिजे. हे श्रद्धेने मानणे म्हणजे अंधश्रद्धा नव्हे. विवेकबुद्धीने हे जाणायचे आहे. सृष्टीतील असंख्य रहस्यांचा वेध घेण्याचे मानवी प्रयत्न अनादिकालापासून सुरू आहेत. विज्ञानाबरोबर अध्यात्माचीही धडपड तीच आहे. अध्यात्म व विज्ञान ह्या अंतिम सत्याचाच शोध घेण्याचे काम

करताहेत. अंतिम उद्दिष्ट एकच आहे. वेद-उपनिषदांनी ह्या सत्याचाच शोध घेतला आहे. ऋषींच्या आत्मचिंतनातून, कठोर तपश्चर्येतून, साधना-बळावर व त्यांच्या अनुभूतीतून हे सत्यान्वेषण झाले आहे. गीता तर ह्या उपनिषदांचे सार आहे. गीतेतील एकेका अर्धवाक्यातूनसुद्धा ह्या तत्त्वज्ञानाचे दर्शन घडते. ''**अहं कृत्स्नस्य जगतः प्रभवः प्रलयस्तथा**'' (गीता ७.६) हे सुद्धा सिद्धान्तरूपी असेच अर्धवाक्य. भगवंताचे अस्तित्व ही सिद्ध करण्याची गोष्टच नाही. ''ईश्वराचे अस्तित्व'' हा वाद-विवादाचा विषय होऊ शकत नाही. जी गोष्ट श्रद्धेने, दृढ भावाने, अनुभूतीने जाणायची, त्यावर मर्यादित बुद्धीने, शब्दपांडित्याने कोणते भाष्य करायचे? ''**ईशावास्यम् इदं सर्वम् यत्किञ्च जगत्यां जगत्**'' (ईशा. उप. १) जगात जे जे काही आहे, परा-अपरा, जड-चेतन, चराचर सर्व काही, ह्यांमध्ये ईश्वराचे अस्तित्व आहे. ईश्वरावाचून कोणतीही वस्तू अस्तित्वात नाही, ही उपनिषदांची गर्जना आहे. गीतेने एवढी उदार दृष्टी स्वीकारली आहे की, सोळाव्या अध्यायात दैवी गुणांबरोबर आसुरी विचारांचाही ऊहापोह केला आहे. ईश्वराचे अस्तित्व नाकारणाऱ्यांचेही तत्त्वज्ञान मांडले आहे. त्याचे कारण तो ईश्वर स्वतःसिद्धच आहे. केवळ संयोग व वियोग ह्यांच्यामुळेच ही सृष्टी चालली नसून 'अहं' कृत्स्नस्य जगतः' हे तिसरे तत्त्व मानावेच लागते. केवळ इंद्रियांमुळे होणाऱ्या दृश्य ज्ञानावर विश्वास ठेवता येत नाही. मानवी बुद्धीला मर्यादा आहे. 'माझ्या बुद्धीला हे पटत नाही' असे म्हणण्याची एक फॅशन झाली आहे. पण 'माझी बुद्धी' ही किती मर्यादित, पूर्वसंस्कारसंचित, वासनेने, विकारांनी मलिन झालेली आहे, ह्याचा 'मी' विचारच करीत नाही. शुद्ध बुद्धीतच ज्ञानाचा जन्म होतो. शुद्ध अंतःकरणात ज्ञान सुप्रतिष्ठित होते. गीतेच्या ह्या चार श्लोकांत ही मांडणी सूत्रबद्ध केली आहे. अपरा (जड) → परा (चेतन) → ईश्वर (चैतन्य) असे ह्याचे स्वरूप आहे.

ज्ञानदेवांनी ह्या चैतन्याविषयी म्हटले आहे,

**या उपाधिमाजीं गुप्त । चैतन्य असे सर्वगत ।**
**ते तत्त्वज्ञ संत । स्वीकारिती ।।२-१२६।।**

''या देहादि प्रपंचामध्ये, ह्या वस्तुरूप जगतामध्ये सर्वत्र चैतन्य गुप्तरूपाने व्यापलेले आहे. ते तत्त्व, तत्त्वज्ञ, संत स्वीकारतात व त्याच दृष्टीने व्यवहार करतात.''

पण हे तत्त्व आपण स्वीकारीत नाही. सर्वच संत-महात्म्यांना ही दृष्टी होती. संत तुकारामांना तर हे विश्वच ईश्वरमय दिसत होते.

**विष्णुमय जग । वैष्णवांचा धर्म ।**
**भेदाभेद भ्रम । अमंगळ ।।**

परब्रह्माचे वर्णन करताना संत रामदासस्वामी म्हणतात,



**जिकडे पहावे तिकडे अपार । कोणीकडे नाही पार ।।**
**एक जिनसी स्वतंत्र । दुसरे नाही ।।** (दास. २०.२.३)

कपिल सांख्यशास्त्राप्रमाणे मात्र प्रकृती व पुरुष हे दोन्ही अनादिच नव्हेत तर स्वतंत्र व स्वयंभूही आहेत. वेदान्ती, प्रकृती परमेश्वरापासून उत्पन्न झालेली, म्हणून स्वयंभू नाही व स्वतंत्रही नाही असे समजतात. ज्याला गीतेत क्षेत्रज्ञ किंवा आत्मा म्हटले तोच हा पाहणारा, ज्ञाता, उपभोग घेणारा असून यासच सांख्यशास्त्रात 'पुरुष' किंवा ज्ञ (ज्ञाता) असे म्हणतात. हा ज्ञाता स्वभावतःच निर्गुण, निर्विकार असून केवळ जाणण्या व पाहण्यापलीकडे तो काही करत नाही. जगातले सर्व व्यवहार हे केवळ 'प्रकृती'मुळे घडतात. म्हणजे प्रकृती त्रिगुणात्मक तर पुरुष निर्गुण, उदासीन व अकर्ता... अशी ही दोन भिन्न भिन्न तत्त्वे या ब्रह्मांडात स्वतंत्र, स्वयंभू, अनादिसिद्ध आहेत, असा सांख्यशास्त्राचा सिद्धांत आहे. सांख्यशास्त्राप्रमाणे सृष्टीतील सर्व पदार्थांचे अव्यक्त (मूळ प्रकृती), व्यक्त (तिचे विकार) व पुरुष (ज्ञ) असे तीन वर्ग होतात. पण यापैकी व्यक्त पदार्थांचे स्वरूप प्रलयकाळी नाश पावत असल्याने मुळात अव्यक्त प्रकृती व पुरुष ही दोनच तत्त्वे राहतात व तीही अनादी, स्वयंभू आहेत, असा सांख्यशास्त्राचा सिद्धांत! ईश्वर हे तिसरे तत्त्व सांख्यांना अमान्य आहे.

प्रकृती आणि पुरुष याच्या पलीकडे जगाचे परब्रह्मरूपी एकच मूलभूत तत्त्व असून त्यापासून प्रकृती-पुरुष यांसह सर्व ब्रह्मांड उत्पन्न झालेले आहे, हे गीतेचे प्रतिपादन आहे. प्रकृती, परमेश्वराच्या इच्छेनेच आपला संसार करीत आहे, ती स्वतंत्र नाही. हे गीतेचे सांगणे आहे. (गीता ९.१०) परंतु कपिलांनी मात्र प्रकृती स्वतंत्र मानली आहे.

हा एक स्वतंत्र विषय आहे. 'ज्ञान' ह्या व्यापक अर्थाने 'सांख्य' शब्दाचा वापर झाला आहे. पण कपिलांनी शास्त्र या दृष्टीने सृष्टीच्या उत्पत्तिक्रमाची तर्कशुद्ध मांडणी केली आहे.

भगवद्गीतेतही याच सांख्यक्रमाचे मुख्यत्वेकरून उल्लेख आलेले असल्यामुळे हे ओझरते विवेचन केले आहे...

हे सर्वव्यापक तत्त्व तसेच त्याची परा-अपरा प्रकृती ह्यांचे स्वरूप आपण पाहिले. आता पुढील श्लोकांत भगवंत त्यासंबंधी आणखी स्पष्टीकरण करीत आहेत.

**रसोऽहमप्सु कौन्तेय प्रभास्मि शशिसूर्ययोः ।**
**प्रणवः सर्ववेदेषु शब्दः खे पौरुषं नृषु ।।८।।**
**पुण्यो गंधः पृथिव्यां च तेजश्चास्मि विभावसौ ।**
**जीवनं सर्वभूतेषु तपश्चास्मि तपस्विषु ।।९।।**

बीजं मां सर्वभूतानां विद्धि पार्थ सनातनम् ।
बुद्धिर्बुद्धिमतामस्मि तेजस्तेजस्विनामहम् ।।१०।।
बलं बलवतां चाहं कामरागविवर्जितम् ।
धर्माविरुद्धो भूतेषु कामोऽस्मि भरतर्षभ ।।११।।

"हे कौन्तेया! पाण्यामध्ये रस मी. चंद्रसूर्यामधली प्रभा मी. सर्व वेदांमधला प्रणय म्हणजे ॐकार मी. आकाशात शब्द मी. आणि सर्व पुरुषांमधले पौरुषही मी आहे." ।।८।।

"आणि पृथ्वीच्या ठिकाणी पवित्र गंध मी व अग्नीमधले तेज मी आहे. सर्व भूतातील जीवनशक्ती व तपस्व्यांमधले तप मी आहे." ।।९।।

"हे पार्था! सर्व भूतांचे सनातन बीज मी असे समज. बुद्धिमान लोकांची बुद्धी मी व तेजस्व्यांचे तेजही मी आहे." ।।१०।।

"काम (वासना) आणि राग म्हणजे विषयासक्ती (ह्या दोन्ही) विरहित असे बलवान लोकांचे बळ मी आहे; आणि भरतश्रेष्ठा! धर्माला विरुद्ध न जाणारा असा भूतांच्या ठायी कामही मी आहे." ।।११।।

आकाश, पृथ्वी, पाताळ... ह्या सर्व चराचर सृष्टीत आपल्याशिवाय काहीही नाही हा भगवंताचा निर्वाळा आहे. सर्व पंचमहाभूतांची वेगवेगळी तत्त्वे वरवर जरी भेदात अस्तित्वात दिसली तरी त्यांमध्ये एक अखंड एकसत्ता आहे.

सर्व पंचमहाभूतांतून आपली इंद्रिये जे अनुभव घेत असतात त्या सर्व अनुभवांना आधारभूत असलेली शक्ती एकच आहे. ही सर्व भूतांना आधारभूत धारण करणारी जी एकता आहे ती 'ज्ञान' ह्या संज्ञेत समाविष्ट होते. निरनिराळ्या सर्व भूतांत हे एकच अविभक्त अव्यय तत्त्व आहे, हे ज्या ज्ञानाने कळते ते सात्त्विक ज्ञान आहे, असे पुढे १८व्या अध्यायात प्रतिपादिले आहे. (गीता १८.२०)

वरील चार श्लोकांत भगवंत आपल्या व्यापक स्वरूपाचे वर्णन करीत आहेत, आणि असे करताना, त्यांनी 'कामोऽस्मि भरतर्षभ' म्हणून वैदिक तत्त्वज्ञानातील एका मूलभूत प्रश्नाला निःशंक असे उत्तर दिले आहे. गीतेतील तत्त्वज्ञान हे जीवनस्पर्शी आहे व जीवनव्यापीही आहे. 'काम' हा त्याज्य, तुच्छ नसून तो स्वीकारार्ह आहे. फक्त तो धर्माला विरोधी असता कामा नये. काम ही माझी विभूती आहे, तो मीच आहे असे भगवंत सांगत आहेत. जोपर्यंत श्वास आहे तोपर्यंत 'ह्या' ना 'त्या' स्वरूपात 'काम' हा राहणारच. भगवंताची इच्छा करणे हे सुद्धा त्याचेच शुद्ध सात्त्विक स्वरूप. विषय-विकार ही भगवंताने मनुष्याला दिलेली खेळणी आहेत. काही वेळेपुरताच त्या खेळण्यांचा वापर करायचा असतो. साठी ओलांडल्यानंतरसुद्धा आपण खेळणी सोडत नाही. 'काम' जर उपरण्यासारखा जेव्हा हवा तेव्हा वापरायचा व नको तेव्हा बाजूस सारायचा अशी निश्चयी, दृढ,



निकोप, संयमित व धर्मबुद्धीने प्रमाणित जीवनदृष्टी असेल तर मनुष्याला तो काम बाधक ठरत नाही. इथे 'काम' हा शब्दप्रयोग लैंगिक प्रवृत्ती ह्या अर्थाने वापरला नसून तो 'इच्छा', 'वासना', 'हे हवे, ते हवे', अशा अर्थाने वापरला आहे. वैदिक तत्त्वज्ञान हे जीवनापासून प्रपंचापासून दूर नेणारे तत्त्वज्ञान बिलकूल नाही. 'जिजीविषेत् शतः समाः' (शंभर वर्षे आनंदाने जगा) असा आशादायी, उत्साही जीवनमंत्र सांगणारे हे तत्त्वज्ञान आहे.

पाण्यामध्ये रस, वाऱ्यामध्ये स्पर्श. चंद्रसूर्यामधले तेज, आकाशाच्या ठिकाणी असणारा शब्द, वेदांमधील ॐकार. मनुष्याच्या ठिकाणी अहंपणाचे सारभूत जे पुरुषत्व, पराक्रम आहे... हे सर्व काही मी आहे असे भगवंत म्हणतात.

संपूर्ण वेदांतील सारतत्त्व म्हणजे ॐकार. ॐकार हे माझेच रूप आहे असे भगवंत सांगतात. ॐकार हे प्रणवतत्त्वच सर्वस्व आहे. याचे ध्यान करणे म्हणजे परमात्म्याच्या समस्त शक्तीची आराधना करण्यासारखे आहे. भगवंताच्या तिन्ही शक्ती यामध्ये एकवटल्या आहेत. ज्या वेळी आपण ॐकाराचा उच्चार करतो तेव्हा त्यातील तीन अक्षरे समोर येतात. अ, उ आणि म. 'अ'चा ज्या वेळी आपण उच्चार करतो तेव्हा ओठ उघडतात, तोंडही उघडते. या समस्त विश्वाला निर्माण करणाऱ्या ब्रह्माचे स्मरण यात आहे. भगवंताची सर्जनशक्ती 'अ'च्या उच्चारात सामावली आहे. 'उ'च्या उच्चारात या विश्वाचे पालनपोषण करणारे जे 'विष्णुतत्त्व आहे ते यात समाविष्ट आहे. 'उ'च्या उच्चाराच्या वेळी मुखाचा आकार गोलाकार करावा लागतो. ब्रह्मांडाचा आकारही तसाच धारण केला आहे. 'म'च्या उच्चारात ओठ बंद होतात. या समस्त संसाराचा विलय, अस्त करण्याचे शिवतत्त्वही तोच परमात्मा आहे. विश्वाचा कर्ता, धारण-पोषण करणारे व शेवटी स्वतःत संपूर्ण विश्व सामावून घेणारे, सर्वशक्तिमान परमतत्त्व एकच आहे. ब्रह्मा, विष्णू, महेश या तिन्ही शक्ती ॐकारामध्ये सामावल्या आहेत. म्हणून वेदांच्या या सारतत्त्वाचा उच्चार करणे म्हणजे परमेश्वराचेच चिंतन केल्यासारखे आहे. भगवंताने आपल्या स्वरूपाचे येथे वर्णन केले आहे. पृथ्वीत असणारे पुण्य गंध, अग्नीतील तेज, तपस्वी लोकांचे तप, एवढेच नव्हे तर सर्व प्राणिमात्रातील जीवनशक्ती, चेतनतत्त्वही तो परमेश्वरच आहे. साऱ्या सृष्टीत भगवंताशिवाय दुसरे काही नाही. आपले अन्न पचविणारासुद्धा तोच आहे. वैश्वानर बनून देहात तोच अन्न पचवितो. चार दाणे पेरून चारशे दाणे ही पृथ्वीमाता देते. या विश्वातील जलतत्त्व हीच आपली प्राणशक्ती आहे. जसा शरीरात ७० टक्के पाण्याचा अंश आहे, तसे या पृथ्वीवरदेखील पाण्याचे तेवढे प्रमाण आहे. या पाण्यातील रस, जीवनशक्ती हे परमतत्त्वच आहे. त्याच्याच कृपेने चंद्र-सूर्याचा प्रकाश, अग्नीतील तेज, जल-वायू-पृथ्वीतील अन्न हे सर्व

निर्माण होते. परमात्म्याचे हे व्यापक तत्त्व जो खऱ्या अर्थाने जाणतो, अनुभवतो तोच परमेश्वराचे स्वरूप जाणतो.

जिकडे तिकडे सर्वत्र भगवंताचे अस्तित्व आहे हे गीतेचे प्रतिपादन आहे. प्रसिद्ध आंग्ल कवी मिल्टन की ज्याने Paradise Lost व Paradise Regained सारखी गूढवादी व अध्यात्मपर अशी महाकाव्ये रचली त्याने आपल्या बालपणी शाळेत असताना ईश्वराच्या अस्तित्वाबाबत दिलेले उत्तर खूप मार्मिक आहे. एक धर्मोपदेशक त्यांच्या शाळेत आला होता. 'देव कोठे आहे?' असा प्रश्न त्याने विचारला व बरोबर उत्तर मिळाल्यास एक नारिंगे बक्षीस देण्याचे त्याने जाहीर केले. छोट्या मिल्टनने उत्तर दिले, "फादर, देव कोठे नाही ते तुम्ही मला सांगा. म्हणजे मी तुम्हांला दोन नारिंगे बक्षीस देईन." ही गोष्ट जितकी लहान तितकी महान आहे. आपल्याकडे पुराणातसुद्धा अशीच एक कथा आहे. गुरूने शिष्याची परीक्षा घेण्यासाठी असे सांगितले की, ज्या ठिकाणी कोणीही नाही त्या ठिकाणी पक्ष्याला मारून ये. शिष्य सर्वत्र जाऊन परत आला आणि उत्तर दिले की, असे कोणतेही ठिकाण नाही की जिथे भगवंताचा वास नाही. गुरू म्हणाले की, हेच आत्मज्ञान. गीतेत भगवंताच्या अणुरेणूत असलेल्या अस्तित्वासंबंधी अनेकवेळा स्पष्ट, निःसंदिग्ध विवेचन आले आहे. ही जाणीव एकदा आली की मनुष्याचा जीवनविषयक दृष्टिकोण आमूलाग्र बदलतो. दृष्टी बदलली की सृष्टी बदलते. भगवंत बुब्बुळात बसला पाहिजे म्हणजे जिथे तिथे तोच दिसायला लागतो. पण वस्तुस्थिती अशी आहे की आम्हांला भगवंत फक्त मंदिरात दिसतो. आम्ही तिथे असेतोपर्यंत जमेल तेवढ्या एकाग्र चित्ताने व शुद्ध भावाने भगवंताची आराधना करतो, पण मंदिरातून बाहेर पडलो की झाले आपले सर्व काम-विकार-वासनायुक्त नित्य व्यवहार सुरू. आपण हे विसरतो की मंदिराबाहेरही ईश्वर आहे आणि तो आपली सर्व कृत्ये पाहत असतो. गीता पुनःपुन्हा प्रतिपादते की, ईश्वर जसा सर्व भूतमात्रांच्या हृदयात आहे तसा संपूर्ण सृष्टीच्या अणुरेणूत भरून राहिला आहे. सृष्टीत विविधता आहे. भूतमात्रात वैविध्य आहे. मानव समाजसुद्धा अनेकरंगी, अनेकढंगी आहे. सर्व काही विनाशी आहे, पण ह्या सर्वांत एकच अविनाशी परमेश्वर भरून राहिला आहे. हे समजणे याचे नाव 'ज्ञान' आणि एकाच नित्य परमात्मतत्त्वापासूनच विविध नाशवंत पदार्थ कसे होतात हे समजणे याचे नाव 'विज्ञान'. हे 'ज्ञानविज्ञान' समजावताना भगवंत पुढील चार श्लोकांत आपली माया व तिचे स्वरूप कसे आहे हे विशद करतात.

**ये चैव सात्विका भावा राजसास्तामसाश्च ये ।**
**मत्त एवेति तान्विद्धि न त्वहं तेषु ते मयि ।।१२।।**
**त्रिभिर्गुणमयैर्भावैरेभिः सर्वमिदं जगत् ।**
**मोहितं नाभिजानाति मामेभ्यः परमव्ययम् ।।१३।।**



**दैवी ह्येषा गुणमयी मम माया दुरत्यया ।**
**मामेव ये प्रपद्यन्ते मायामेतां तरन्ति ते ।।१४।।**
**न मां दुष्कृतिनो मूढाः प्रपद्यन्ते नराधमाः ।**
**माययापहृतज्ञाना आसुरं भावमाश्रिताः ।।१५।।**

"आणि जे काही सात्त्विक व जे काही राजस किंवा तामस भाव म्हणजे पदार्थ आहेत ते सर्व माझ्यापासून असे समज. पण ते माझ्यात आहेत; मी त्यांच्यात नाही." ।।१२।।

"सत्त्व, रज, तम या तीन गुणात्मक भावांनी मोहित होऊन हे सर्व जग याच्या पलीकडचा (अर्थात् निर्गुण) जो मी, अव्यय (परमेश्वर) त्या मला जाणत नाहीत." ।।१३।।

"त्रिगुणात्मिका अशी ही माझी दिव्य माया तरून जाण्यास दुस्तर आहे. पण जे मलाच शरण येतात ते या मायेला तरून जातात." ।।१४।।

"मायेने ज्यांचे ज्ञान नष्ट केले, ते मूढ, अधम, दुष्कर्मी नराधम आसुरी बुद्धीत पडून मला शरण येत नाहीत." ।।१५।।

भगवंताची ही विश्वरचना अत्यंत मोहकारक आहे. ब्रह्मांडात अनेक वस्तू व अनंत वृत्ती दिसतात. कुणाला हे जग सुंदर वाटते, मनुष्य ही ईश्वराची सुंदर कलाकृती वाटते, हा पसारा सत्य भासतो; तर कुणाला हा आभास वाटतो, स्वप्न वाटते. माणसाच्या वृत्तींना विविधतेचे किती पैलू असावेत? विचार करताना मती गुंग होते. कालच माझ्या वाचनात दोन घटना आल्या. एक साताऱ्यातील प्रसंग व दुसरा एका बकाल, प्रचंड शहराच्या गर्दीतील. एकात माणुसकीचा, प्रामाणिकपणाचा उत्कट आविष्कार तर दुसऱ्यात माणुसकीला कलंक असणारा राक्षसी, आसुरी, अघोरी असा प्रकार. थोडक्यात कथा अशी. साताऱ्यात मुंबईहून आलेल्या एका व्यक्तीकडे एक कोटी बंपर लॉटरी मिळाल्याचे तिकीट होते. तो अशिक्षित असल्याने ते एक लाखाचे असे समजत होता. ५० हजारांत विकण्याची त्याची तयारी होती. चौकशी करीत असताना चार सात्त्विक व्यक्ती त्याला भेटल्या. त्या चौघांनी परिस्थितीचे गांभीर्य जाणून त्याला जिल्हाधिकारी मीरा बोरवणकर ह्या अत्यंत प्रामाणिक, कर्तबगार अधिकाऱ्याकडे नेले. त्या अशिक्षित माणसाला पोलीस संरक्षण दिले. जयपूरमध्ये असलेल्या त्याच्या घरच्या मंडळींना बोलाविण्यात आले. इतक्या प्रचंड रकमेचा कसलाही मोह न बाळगता व कोणताही अपप्रकार न करता त्या चार प्रामाणिक व्यक्तींनी केलेल्या ह्या गौरवास्पद कृतीचे मोल कोणी करू शकेल का? दैवी गुणांनी संपन्न अशा व्यक्तीही जगात आहेत व दुसरीकडे राक्षसांनासुद्धा लाजवील अशी घटना! एका माणसाला काही अज्ञात व्यक्तींनी अज्ञात ठिकाणी नेले. त्या व्यक्तीला भूल देऊन त्याच्या शरीरातील किडनीसारखे अवयव काढून घेण्याची योजना होती. त्याच्या सुदैवाने

तो रक्तगट असलेली माणसे त्यांच्याकडे आधीच मिळाल्याने त्याला पुन्हा डोळे बांधून, भूल देऊन सोडून देण्यात आले. प्रत्यक्ष जीवघेणा अनुभव भोगलेल्या व्यक्तीने स्वतः सांगितलेली ही हकिकत. अशा अनेक घटना वर्तमानपत्रांतून प्रसिद्ध होतात. मती सुन्न होते. कुठे क्रोधाचा अतिरेक तर कुठे द्वेष, मत्सर ह्यांमुळे सर्वनाश करण्याची प्रवृत्ती. लोभ व मोह ह्यांमुळे आत्मनाश. हे सर्व एका बाजूला तर दुसऱ्या बाजूला इंद्रधनुष्याच्या विविध मोहक रंगांप्रमाणे प्रेम, करुणा, दया, माणुसकी ह्यांचे गहिरे रंग! एकाच चित्रकाराच्या हातात असलेल्या एकाच कुंचल्याने अनेक रंगांची, छटांची, अनेक नमुन्यांची काढलेली चित्रे जशी असावीत तशी ही माणसे! ही विश्वरचना करताना त्या विधात्याने असेच रंग ह्या जगात भरले आहेत. हे सारे एकाच चैतन्यशक्तीचे खेळ आहेत. माठांचे आकार वेगवेगळे असतात, पण त्यात सामावलेले आकाश एकच असते. तसा एकच एक अखंड आत्मा व एकच अष्टधा प्रकृती सर्वत्र विलसत असते. परस्परविरुद्ध भावांमध्ये, वृत्तींमध्ये एकच चैतन्यतत्त्व भरले आहे. आत्मा व जड प्रकृती ह्या संयोगामुळेच ही सारी सृष्टी जन्मली आहे. मग हे असे जर असेल तर ह्या जगात हा वेगवेगळेपणा का? वरील चार श्लोकांत भगवंतांनीच ह्याचे उत्तर दिले आहे. सात्त्विक, राजस, तामस हे सर्व गुण आपल्यापासूनच निर्माण झाले आहेत असे भगवंत सांगतात. हे त्रिगुण ईश्वरापासून निर्माण झालेले असले तरी ईश्वर त्यांच्यामध्ये नाही. ह्या त्रिगुणात्मक मायेने मोह पाडलेले हे जग आहे. विद्या, अज्ञान ह्यांमुळे ईश्वराच्या सत्य स्वरूपाचे ज्ञान होत नाही. १३ व्या श्लोकावर ज्ञानेश्वर महाराज सुंदर निरूपण करतात

**''तैसे भूतजात सर्व । हे माझेचि कीर अवयव ।**
**परि मायाजोगे जीव । दशे आले ।।६६।।**
**म्हणोनि माझेचि मी नव्हती । माझेचि मज नोळखिती ।**
**अहंममता भ्रांती । विषयांध झाले ।।६७।।**

''सर्व प्राणिमात्र हे खरोखर माझे अवयव आहेत, पण मायेच्या योगाने जीवदशेस आले. म्हणून ते माझेच असूनही मी नाहीत. माझेच असूनही ते मला ओळखत नाहीत. त्यांच्यामध्ये 'मी' आणि 'माझेपणा'ची भ्रांती असल्यामुळे ते विषयांध झाले आहेत.''

अशी ही त्रिगुणात्मक दिव्य माया तरून जाण्यास दुस्तर आहे. पण जे भगवंताला पूर्णपणे शरण जातात ते ही माया तरून जातात. माया म्हणजे परमेश्वराचीच एक अनिर्वचनीय शक्ती! सांख्यशास्त्रातील त्रिगुणात्मक प्रकृती हीच गीतेत भगवंतांनी सांगितलेली त्याची माया. आणि शरणागती म्हणजे विशुद्ध भक्ती. ही भक्ती असेल तरच ह्या विश्वरचनेचे रहस्य समजेल. मायेच्या ह्या सुखदुःखाच्या भोवऱ्यातून सुटून अखंड शांतीचा, सुख-समाधानाचा झरा



हवा असेल तर मायापती भगवंताला पकडले पाहिजे. भक्तीनेच ही अविद्यारूपी माया जाऊन विशुद्ध आत्मानंदाचा लाभ होईल. ह्या मायानदीचे वर्णन करताना ज्ञानेश्वर माऊलींच्या वक्तृत्वाला बहर आला आहे. संकल्परूपी उसळीमुळे त्या मायानदीत पंचमहाभूतांचा बुडबुडा उत्पन्न झाला, प्रवृत्ती व निवृत्ती ह्या दोन्ही उंच काठांबाहेर वाहते. द्वेषरूपी भोवरे, मत्सररूपी वळणे, कर्माकर्मरूपी पूर, कामरूपी लाटा, अहंकाराच्या मोठ्या धारा, शरीररूपी बुडबुडे, ज्ञानाचे भोवरे, भ्रांतीच्या गढूळपणाने आशारूप गाळात फसलेले प्राणी, पुनर्जन्मरूपी लाटांची उसळी..., असे मायानदीचे बहारदार वर्णन आहे. बुद्धिरूपी बाहूने जे नदीत शिरले ते कोठे गेले ह्याचा पत्ताच नाही. कर्मरूपी बाहूंवर ज्यांनी विश्वास ठेवला ते विधिनिषेधांच्या वळणात सापडले. कित्येकांनी यज्ञक्रियारूपी पेटी ही मायानदी तरण्याकरिता बांधली ते स्वर्गसुखाच्या कपारीमध्ये अडकून राहिले. अष्टांगयोग, वैराग्य, कर्म, यज्ञ अशा कोणत्याच एकाकी मार्गाने ही मायानदी पार करता येत नाही. मग ही महत्तत्त्वादि माया पार करण्याचा उपाय काय? ''मामेव ये प्रपद्यन्ते'' हा एकमेव उपाय भगवंतच आपल्याला सांगतात. ज्ञानेश्वर माऊलींच्या शब्दात,

**येथे एकचि लीला तरले । जे सर्वभावे मज भजले ।**
**तयां ऐलीच थडिये सरले । मायाजळ ।।९७।।**
**जया सद्‌गुरु तारु पुढे । जे अनुभवाचिये कासे गाढे ।**
**जया आत्मनिवेदन तरांडे । आकळले ।।९८।।**
**जे अहंभावाचे ओझे सांडुनी । विकल्पाचिया झुळका चुकवुनि ।**
**अनुरागाचा निरु ताउनी । पाणी ढाळू ।।९९।।**
**जया ऐक्याचिया उतारा । बोधाचा जोडला तारा ।**
**मग निवृत्तीचिया पैलतीरा । झेपावले जे ।।१००।।**
**ते उपरतीचा वोवी सेलत । सोऽहंभावाचेनि थावे पेलत ।**
**मग निघाले अनकळित । निवृत्तितटी ।।१०१।।**
**येणे उपाये मज भजले । ते हे माझी माया तरले ।**
**परि ऐसे भक्त विपाइले । बहुवस नाही ।।१०२।।**

''या ठिकाणी जे सर्वभावाने मला भजले, तेच एक ही मायानदी सहज तरून गेले. त्यांना मायानदीच्या अलीकडच्या काठावर तिचे पाणी संपले.'' ।।९७।।

''ज्यास सद्‌गुरू हा पुढे तारणारा (नावाडी) आहे. ज्या साधकांनी आत्मानुभवरूपी कासोटा घट्ट बांधला आहे व ज्यांना आत्मनिवेदनरूपी तापा प्राप्त झाला आहे.'' ।।९८।।

''जे अहंभावाचे ओझे टाकून, विकल्परूपी वाऱ्याच्या झुळका चुकवून, संसारावरील प्रेमाच्या ओहोटीचे पाणी तपासून.'' ।।९९।।

"व ज्यांना जीव व परमात्मा यांच्या ऐक्यरूपी उतार असलेल्या पाण्यात ज्ञानरूपी सोपी पायवाट सापडून मग जे (पलीकडच्या) निवृत्तिरूपी तीराकडे वळले." ।।१००।।

"वैराग्यरूपी हातांनी पाणी तोडीत व मीच परमात्मा आहे, अशा समजुतीच्या बळाने तोल सांभाळीत कसल्याही अडचणीत न पडता, निवृत्तिरूप काठावर ते बाहेर आले." ।।१०१।।

"या उपायाने जे मला भजले, ते ही माझी माया तरून गेले. परंतु असे भक्त थोडे आहेत फार नाहीत." ।।१०२।।

- महत्तत्त्वादि जी भगवंताची माया आहे, तिला ज्ञानेशांनी, मायानदीचे सुंदर रूपक, या वरील ओव्यातून शब्दबद्ध केले आहे. ही मायानदी पार करावयास अत्यंत कठीण आहे. पण तीही पार करता येते. पार करण्याचे सोपान येथे सांगितले आहेत. या मायानदीचा अलीकडचा तट हा प्रवृत्तीचा, प्रपंचाचा आहे व पलीकडचा तट हा निवृत्तिमार्गाचा, मोक्षाचा आहे. या त्रिगुणात्मक मायेच्या मोहामुळेच आपण ईश्वरापासून दूर गेलो आहोत. या नदीत द्वेषरूपी भोवरे, मत्सररूपी वळणे, संकल्प-विकल्परूपी झुळका, कामरूपी लाटा, अहंकाराच्या मोठ्या धारा, मद, गर्व, अभिमानरूपी धारा, अज्ञानाचे भोवरे, तमोगुणाची प्रचंड धार, भ्रांतीचे गढूळ पाणी वाहते आहे. अशी ही नदी तरून जावयास अत्यंत महाकठीण आहे. या मायानदीतून तरून जाण्याचा प्रयत्न ज्ञानी लोक करतात पण अभिमानाचा धोंडा घेऊन त्यात ते बुडून जातात. काही लोक यज्ञयागक्रियारूपी पेटी आपल्या पोटाशी बांधून तरून जाण्याचा प्रयत्न करतात, पण स्वर्गसुखाच्या मोहरूपी कपारीमध्ये अडकतात. काहीजण कर्मरूपी बाहूवर विश्वास ठेवून, नदीत उतरतात तर काहीजण वैराग्याची नाव घेऊन नदीत प्रवेश करतात. अशा प्रकारे स्वतःच्या बळावर जे या मायानदीत उतरतात त्यांना ही नदी पार करता येत नाही. मध्येच ते गटांगळ्या खातात व बुडून जातात.

माया हो भगवंताचीच शक्ती आहे. या शक्तीला वश करायचे असेल तर मायापती असलेल्या भगवंताला सर्व भावानी शरण जाऊनच ते करता येईल. स्वतःच्या सामर्थ्यावर मी एकटा पार करू शकेन असे न म्हणता, सद्गुरूंच्या आश्रयाने, त्यांच्या कृपाप्रसादाने या मायानदीतून पार होता येईल. अहंभाव सोडून, अनासक्त होऊन, ज्ञानाचे साधन स्वीकारून, वैराग्य अंगी बाणवून, सोऽहंभाव मनी दृढ करून सद्गुरूंच्या नावेत निवांत बसून ही मायानदी पार करता येते, पण असे करणारे भक्त अत्यंत अल्प आहेत.

सातव्या अध्यायातील संपूर्ण भाव साररूपाने या माऊलींच्या वरील ओव्यांतून व्यक्त झाला आहे. 'मय्यासक्तमनाः' हा पहिल्याच श्लोकात भगवंतांनी सांगितलेला उपाय आहे. भगवंताला मन व बुद्धी अर्पण करूनच शरणागतता साधता येते.



केवळ भगवंताच्या भक्तीनेच, पूर्ण शरणागतीनेच हे शक्य आहे. भगवंताला जाणण्यासाठी व अविद्या, अज्ञान, तमोरूपी अंधार नाहीसा करण्यासाठी भक्तीचे अमोघ साधन आपल्याला ह्या अध्यायात श्रीकृष्णांनी दिले आहे. अक्षय आनंदाचा ठेवा ह्या भक्तीत आहे. एऱ्हवी फसव्या, मोहक, क्षणभंगुर, इंद्रियजन्य सुखामुळे ह्या चिदानंदाची प्राप्ती आपल्याला कुठे होते? भक्ती असेल तरच हे मृगजळ नाहीसे होईल.

आता निष्काम भक्ती करणाऱ्या चार प्रकारच्या भक्तांचे वर्णन पुढील चार श्लोकांत भगवान श्रीकृष्ण करीत आहेत -

**चतुर्विधा भजन्ते मां जनाः सुकृतिनोऽर्जुन ।**
**आर्तो जिज्ञासुरर्थार्थी ज्ञानी च भरतर्षभ ।।१६।।**
**तेषां ज्ञानी नित्ययुक्त एकभक्तिर्विशिष्यते ।**
**प्रियो हि ज्ञानिनोऽत्यर्थमहं स च मम प्रियः ।।१७।।**
**उदाराः सर्व एवैते ज्ञानी त्वात्मैव मे मतम् ।**
**आस्थितः स हि युक्तात्मा मामेवानुत्तमां गतिम् ।।१८।।**
**बहूनां जन्मनामन्ते ज्ञानवान्मां प्रपद्यते ।**
**वासुदेवः सर्वमिति स महात्मा सुदुर्लभः ।।१९।।**

"हे भरतश्रेष्ठा, अर्जुना! चार प्रकारचे पुण्यवान लोक माझी भक्ती करीत असतात. 'आर्त' म्हणजे (भव) रोगाने पिडलेले; 'जिज्ञासू' म्हणजे ज्ञान प्राप्त करून घेण्याची इच्छा बाळगणारे, 'अर्थार्थी' म्हणजे द्रव्यादिक काम्यवासना मनात ठेवणारे आणि 'ज्ञानी' म्हणजे परमेश्वराचे ज्ञान होऊन कृतार्थ झाल्यामुळे पुढे काही मिळवायचे नसले तरी निष्कामबुद्धीने भक्ती करणारे"... ।।१६।।

"यापैकी एक भक्ती म्हणजे अनन्यभावे माझी भक्ती करणारा व नेहमीच युक्त म्हणजे निष्कामबुद्धीने वागणारा असा जो ज्ञानी त्याची योग्यता विशेष होय! ज्ञानी भक्ताला मी अत्यंत प्रिय व ज्ञानी मला अत्यंत प्रिय आहे." ।।१७।

"सर्वच हे भक्त उदार म्हणजे चांगले होत. पण ज्ञानी म्हणजे मीच असे माझे मत आहे. कारण युक्तचित्त होत्साता (सर्वांची) उत्तमोत्तम गती जो मी त्या माझ्याच ठायी तो स्थिरावलेला असतो." ।।१८।।

"अनेक जन्मांनंतर जे काही आहे ते वासुदेव आहे असे अनुभवास येऊन ज्ञानवान मला येऊन पोचत असतो. असा महात्मा अत्यंत दुर्मिळ होय." ।।१९।।

या अध्यायातील १५व्या श्लोकात भोगवादी आसुरी प्रवृत्तीच्या लोकांचे वर्णन आले आहे. पुढे 'दैवासुरसंपद् - विभाग' योगामध्ये (अध्याय १६) याचे विस्तृत वर्णन येणारच आहे. या मायेत गुरफटलेल्या अभक्तांना 'ईश्वरतत्त्वा'वर श्रद्धा तर नसते पण कृतज्ञतेची जाणीवही नसते. आपले जीवन कोण चालवितो? रक्त कोण बनवितो? सकाळी जाग कुणामुळे येते? श्वासोच्छ्वास कोण असेतोपर्यंत

चालतो? या संपूर्ण विश्वाचा नियंता कोण? असे प्रश्नच त्यांच्या बुद्धीत निर्माण होत नाहीत, मग कृतज्ञता तरी या अश्रद्ध जीवाला कशी वाटणार? अशा कृतघ्न माणसाच्या कृतीला दुष्कृती व व्यक्तीला भगवंतांनी 'मूढ' (मूर्ख) म्हटले आहे. संत तुकारामांना हा प्रश्न पडला. ''कोणाचिये सत्ते चाले हे शरीर?'' ''आपुलिया बळे नाही मी बोलवीत । सखा कृपावंत वाचा त्याची'' असे ते म्हणाले. हे शरीर म्हणजे यंत्र आहे व यंत्री तो भगवंत आहे. पण मायेच्या आवरणामुळे अज्ञानी, तमोगुणी लोकांना याची जाणीव नसते.

आता या मायेतून जे बाहेर पडतात ते सश्रद्ध ईश्वराची ह्या ना त्या मार्गाने भक्ती करून जीवन कृतार्थ करण्याचा प्रयत्न करतात. अशा कृतज्ञ, भावमय, भक्तिमय, जीवन जगणाऱ्या भक्तांचे चार प्रकार इथे भगवंत सांगतात.

अध्यात्माच्या प्रांतात कोण कुणाची परीक्षा घेणार? इथे 'आत्मपरीक्षण' हा एवढाच उपाय आहे. गीतेत सोळाव्या अध्यायाची योजना याचसाठी केली आहे. दैवी-आसुरी गुणांतील किती गुण माझ्या अंगी आहेत? माझा वैचारिक विकास किती झाला आहे? याचे मोजमाप मीच करायचे आहे. भगवंत फक्त साक्षीदार! इतर कोणीही नाही. या चार प्रकारच्या भक्तांमध्ये मी कोणत्या वर्गात मोडतो हे आत्मपरीक्षण ज्याने त्यानेच करायचे आहे. गीता हे शास्त्र आहे. भक्ती जर शास्त्रस्वरूप झाली नाही तर त्याचे अपेक्षित फळ प्राप्त होणार नाही. भगवंतांनी हे भक्तीचे सिद्धान्त गीतेत ठायीठायी मांडलेले आहेत.

पहिल्या प्रकारात 'आर्त' भक्तांच्या भक्तीचा निर्देश आहे. सर्व बाजूंनी अपयश, निराशा, दुःख, विवंचना झाल्यानंतर असाहाय्य होऊन पीडित झाल्यानंतर भगवंताची आठवण त्यांना होते. आशा-आकांक्षांची इच्छा-वासनांची अमर्याद गाठोडी घेऊन आपण जगत असतो. दुःख पर्वताएवढे व सुख जवाएवढे घेत, आशेवर जगत असताना अनेक वेळा पदरी वैफल्य प्राप्त होते. कुठेच मार्ग दिसेनासा झाला की मग 'एकमेवाद्वितीयम्' व 'कर्तुमकर्तुम्'... अशा सर्वव्यापी भगवंताची आठवण येते. आज समाजात भक्तीला महापूर आलेला दिसतो. मंदिरातील अलोट गर्दी दिवसेंदिवस वाढत आहे. आर्तता, याचना, मागण्या यांना मर्यादा राहिलेली नाही. त्या एक भगवंतांनी किती गोष्टी स्मरणात ठेवाव्यात याला अंत नाही. दुसरा वर्ग 'जिज्ञासूं'चा! हा थोडा उन्नत वर्ग!! या भक्तांना अनेक कूट प्रश्नांचे उत्तर हवे असते. ते जाणण्याची उत्सुकता अनिवार्यपणे या भक्तात असते. मी कोण? जीव, जगत्, जगदीश्वर यांचे एकमेकांशी नाते कसे असते? भगवंतांनी या जगात दुःख निर्माणच का केले? मृत्यूनंतरची जीवाची अवस्था काय? जगता सत्प्रवृत्त-असुर, श्रीमंत-गरीब, ज्ञानी-अज्ञानी, कुरूप-सुंदर अशी विषमता करण्याचे भगवंताचे प्रयोजन काय?... अशा अनेक गूढ, कूट, अनाकलनीय प्रश्नांचे उत्तर जिज्ञासू व्यक्तींना हवे असते. निदान पुढील



जन्मात तरी दुःख वाट्याला येऊ नये म्हणून या जन्मात उपासना करून भगवंताजवळ जाणारे हे भक्तदेखील 'निष्काम' या वर्गात मोडतात. 'अर्थार्थी' भक्तांना द्रव्य, साधनसामग्री, कीर्ती, सत्ता अशा प्रपंचातल्या गोष्टी भगवंताकडून हव्या असतात. धनलक्ष्मीच्या स्वरूपात पण धर्म-मोक्ष कार्यासाठी हे भक्त मागत असतात. हे सर्व भक्त सत्प्रवृत्त, सात्त्विक प्रवृत्तीचे असल्याने जगाच्या कल्याणासाठी सदैव रत असतात. आर्त, जिज्ञासू व अर्थार्थी हे ''आत्मनो मोक्षार्थं जगत् हिताय च'' या भावनेने ईश्वरच सर्वसत्ताधीश असा दृढभाव मनात ठेवून भक्ती करीत असतात. हे तिन्ही भक्त तसे निष्काम, पण एकांगी. चौथ्या प्रकारचे 'ज्ञानी' भक्त मात्र 'पूर्ण भक्त'! ज्ञानी भक्त हे तर भगवंताचा आत्माच आहेत. ते ईश्वरस्वरूपच आहेत. अशा भक्तांना ईश्वरी सत्तेवाचून दुसरे काहीच आढळत नाही. अनन्यभावाने एकचित्त होऊन भक्ती करणारा व नेहमीच युक्त असणारा असा भक्त भगवंताला आवडतो व त्याला भगवंत आवडतो. भगवंताशी एकरूप झालेल्या या भक्तांना सर्वत्र परमात्म्याचेच दर्शन होते. ''विष्णुमय जग । वैष्णवांचा धर्म ।'' किंवा 'नर नारी बाळे अवघा नारायण । ऐसे माझे मन करी देवा ।'' अशा प्रकारची तुकाराम महाराजांसारखी अवस्था त्यांची होते. ज्ञानियांचा राजा ज्ञानेश्वर हे तर अशा भक्तांचे मुकुटमणी. ''जे जे भेटे भूत । ते ते मानिजे भगवंत'' अशा दृष्टीने ते जगाकडे पाहतात. 'ईशावास्यमिदं सर्वम्' ब्रह्मांडात एकच परमात्मा सर्वत नटलेला आहे असे अनुभवत एक दिवस तेच परमेश्वर होऊन जातात. म्हणून शंकराचार्य, याज्ञवल्क्य, सनकादिक अशा ज्ञानी भक्तांच्या नावामागे 'भगवान शंकराचार्य, भगवान याज्ञवल्क्य अशी बिरुदावली लागते. अशा ज्ञानी भक्तांच्या ठिकाणी भेदाभेद राहिलेला नसतो. ज्ञानाच्या प्रकाशाने त्याच्या ठिकाणचा द्वैताद्वैतरूपी अंधार नाहीसा होतो. ब्रह्मैक्यभावाने तो तद्रूप होऊन राहतो.

आर्त, जिज्ञासू, अर्थार्थी हे सर्वच उदार, सत्प्रवृत्त, सात्त्विक, महान आहेत. पण ज्ञानी भक्त भगवंताचे चैतन्य आहेत. अनेक जन्म घेतल्यानंतर असा ज्ञानवान मला येऊन मिळतो. पण असा महात्मा अत्यंत दुर्मिळ आहे असे भगवंत प्रतिपादतात. ज्ञानेश्वरांच्या शब्दात,

**''हे समस्तही श्री वासुदेवो । ऐसा प्रतीतिरसाचा वोतला भावो ।**
**म्हणोनि भक्तांमाजी रावो । आणि ज्ञानिया तोचि ।।१३६।।**

''हे संपूर्ण विश्व श्रीवासुदेव आहे, अशा अनुभवरूपी रसाचा त्याचा भाव ओतलेला असतो. म्हणून सर्व भक्तांमध्ये तो राजा आहे आणि ज्ञानीही तोच आहे.''

पहिल्या तिघांची एकभक्ती नसते. ज्ञानी मात्र सर्वस्वी ईश्वरावर एकचित्त निष्ठा ठेवून असतात. हे सर्वच निष्काम असले तरी ज्ञानी सोडून इतर भक्त

आपले सर्व सांभाळून ईश्वराला भजत असतात. म्हणून 'उदाराः सर्व एवैते'' असे त्यांना म्हणून ज्ञानी भक्ताला आपले मूर्तिमंत चैतन्य, आत्मा असे भगवंतांनी म्हटले आहे.

निष्काम भक्तीच्या वर्णनानंतर भगवंत आता सकामभक्तीचे स्वरूप पढील श्लोकांत सांगत आहेत -

**कामैस्तैस्तैर्हृतज्ञानाः प्रपद्यन्तेऽन्यदेवताः ।**
**तं तं नियममास्थाय प्रकृत्या नियताः स्वया ।।२०।।**
**यो यो यां यां तनुं भक्तः श्रद्धयार्चितुमिच्छति ।**
**तस्य तस्याचलां श्रद्धां तामेव विदधाम्यहम् ।।२१।।**
**स तया श्रद्धया युक्तस्तस्याराधनमीहते ।**
**लभते च ततः कामान्मयैव विहितान्हि तान् ।।२२।।**
**अंतवत्तु फलं तेषां तद्भवत्यल्प मेधसाम् ।**
**देवान्देवयजो यान्ति मद्भक्ता यान्ति मामपि ।।२३।।**
**अव्यक्तं व्यक्तिमापन्नं मन्यन्ते मामबुद्धयः ।**
**परं भावमजानन्तो ममाव्ययमनुत्तमम् ।।२४।।**

''आपापल्या प्रकृतिनियमाप्रमाणे त्या त्या (स्वर्गादिक फलांच्या) कामवासनांनी वेडावलेले लोक तो तो (उपासनेचा) नियम पाळून दुसऱ्या (निरनिराळ्या) देवतांच्या भजनी लागत असतात.'' ।।२०।।

''जो जो भक्त ज्या ज्या रूपाची म्हणजे देवतेची श्रद्धेने उपासना करू इच्छितो त्याची त्याची तीच श्रद्धा मी स्थिर करतो.'' ।।२१।।

''मग त्या श्रद्धेने युक्त होत्साता, तो त्या देवतेची आराधना करू लागतो आणि मग मीच निर्मिलेली ती कामफले त्याला मिळतात.'' ।।२२।।

''पण (या) अल्पबुद्धी लोकांना मिळणारे ते फल नाशवंत असते. देवांचे भजन करणारे देवांकडे जातात आणि माझे भक्त मजकडे येतात.'' ।।२३।।

''अबुद्धी म्हणजे मूढ लोक माझे पर म्हणजे श्रेष्ठ, उत्तमोत्तम आणि अव्ययरूप न जाणता अव्यक्त अशा मला व्यक्तिभाव प्राप्त झालेला मानतात.'' ।।२४।।

सातव्या अध्यायाचा 'भक्ती' हा प्रधान विषय आहे. श्रेष्ठ भक्ती कोणती? सकाम की निष्काम? भक्ती ज्या ईश्वराची करायची त्याचे स्वरूप नेमके कोणते? डोळस भक्तीचे रहस्य काय? या सर्व प्रश्नांचा ऊहापोह येथे आहे. गीतेने निष्काम भक्तीचे श्रेष्ठत्व प्रतिपादिले आहे. ईश्वराच्या ठिकाणी निरतिशय प्रेम म्हणजे भक्ती! शांडिल्य सूत्रात भक्तीची हीच व्याख्या सांगितली आहे

**''सा भक्तिः परानुरक्तिरीश्वरे''**

नारदीय भक्तिसूत्रात हीच व्याख्या आहे -

**''सा त्वस्मिन परमप्रेमरूपा । अमृतस्वरूपा च ।**



भागवंतही याच परमप्रेमरूपाचा पुरस्कार करते.

**''अहेतुक्यव्यवहिता या भक्तिः पुरुषोत्तमे ।''**

गीता सांगते, ''तू मन, बुद्धी भगवंताला अर्पण कर. निष्काम भावाने फलेच्छा न बाळगता, शरणागत होऊन सर्व कर्मे ईश्वराला अर्पण करणे हीच भक्ती. भक्तीची पराकाष्ठा म्हणजेच 'पराभक्ती'. गीतेची भूमिका अशी आहे की, पराभक्तीमुळे खरे ज्ञान माणसाला प्राप्त होते व मग तो ईश्वराच्या ठायी प्रवेश करतो. (१८.५५) ज्ञान प्राप्त झाल्यास अज्ञानाचा नाश होतो आणि मग तो जीवनात राहूनही मुक्त स्थितीत जगतो (गीता ५.२८). अशा ज्ञानीला मृत्यूनंतर जीवन-मृत्यू चक्रातूनच मुक्ती म्हणजे मोक्ष लाभतो.

**नाही देवापाशी । मोक्षाचे गाठोळे ।**
**आणुनी निराळे । द्यावे हाती ।।**
**इंद्रियांचा जय । साधुनिया मन ।**
**निर्विषय कारण । असे तेथे ।।**

अविद्या, अज्ञान याचा नाश म्हणजे मुक्ती! जे भगवंतावर सततयुक्त होऊन निरतिशय प्रेम करतात, अशा भक्तांना तो बुद्धियोग अर्पण करतो. सकाम भक्तीत मागणे असते तेही प्रापंचिक. भीती हे सकाम भक्तीचे कारण होते. त्यामुळे निरनिराळ्या देवतांची निरनिराळ्या उद्देशासाठी आराधना होते. अनेक जण नाना प्रकारची व्रत-वैकल्ये करतात. आठवड्याचे सर्व वार वेगवेगळ्या देवतांच्या पूजेत व्यतीत करतात. अशा भक्तांच्या बाबतीत भगवंत सांगतात की, जो ज्या अन्य देवतांना भजावयाची इच्छा करतो त्याची ती इच्छा पुरविणारा मीच आहे. देवदेवतान्तरातून मीच आहे. ज्याला जे फळ मिळते तेदेखील सर्व माझ्यामुळे मिळते. परंतु त्या अल्पबुद्धी मनुष्यांना मिळालेले फळ विनाशी ठरते. देवतांची पूजा करणारे देवतांप्रत जातात, पण माझी भक्ती करणारे मजप्रत येतात. सार असे की, **''ये यथा मां प्रपद्यन्ते तांस्तथैव भजाम्यहं ।''** (४.११)

सकाम भक्ती त्याज्य किंवा निकृष्ट नाही. सुरुवातीच्या टप्प्यात त्या भक्तीचे स्वरूप अज्ञानामुळे सकामच असते. देवांजवळ रडणारा, मागणारा, सकाम असला तरी तो ईश्वराचा भक्त आहे. मूल रडायला लागले की, आईच जवळ येते. भगवंत ही माऊलीच आहे. शेवटी मागायचे ते आईकडेच. पण भगवंताकडे जाऊन नेमके काय मागायचे हे माहीत नसल्यामुळे भक्तांची त्रेधा उडते. संत तुकारामांना विठोबांकडे प्रापंचिक वस्तू मागण्यासाठी पाठविले गेले, पण तुकारामांनी ते मागितले नाही. उलट ते म्हणाले,

**''हेचि दान देगा देवा । तुझा विसर न व्हावा''**

एवढेच नव्हे तर ''धन लगे मुक्ति धन संपदा । संत संग देई सदा।'' अशी सार्थ मागणी त्यांची होती. अमृततुल्य गोष्टींची मागणी न करता क्षणभंगुर,

नाशवंत वस्तू सकाम भक्त भगवंताकडे मागतो पण सकाम भक्ती करता-करता असा भक्त निष्कामतेकडे वळतो. या अध्यायात सकाम भक्तांना भगवंताचा दिलासा आहे. कोणत्याही निमित्ताने का असेना जो जो माझ्याजवळ येतो, त्याचा तो तो भाव दृढ करून त्याच्या मनात माझ्याविषयीची प्रीती निर्माण करण्याचा प्रयत्न मी करतो, असे भगवंताचे आश्वासन आहे. शेवटी परमेश्वराची भक्ती ही कृतज्ञता आहे. ती अपूर्व साधना आहे. पुढे तीच निष्काम भावाने दृढ होऊन भगवंताचे सत्य स्वरूप जाणण्यास साहाय्यभूत होते हे निश्चित!

सगुण-निर्गुण स्वरूपाचे वर्णन या अध्यायात आले आहे. भगवंत म्हणतात की, मूढ भक्त मला अव्यक्ताला आकार देतात. ब्रह्माचे मानुषीकरण करतात. निर्गुण, निराकार अशा परब्रह्माचे श्रेष्ठ रूप जाणून न घेता अनाम्याला निरनिराळी नावे ठेवतात. अभेदात भेद मानतात. श्रेष्ठ, दिव्य स्वरूप न पाहता केवळ सगुणाची पूजा करतात. 'सगुण-निर्गुण दोन्ही विलक्षण' हे जरी सत्य असले तरी मूळ स्वरूपाकडे ध्यान न देणाऱ्या भक्तांना भगवंतांनी केलेले हे मार्गदर्शन आहे.

शेवटच्या सहा श्लोकांत आपल्या योगरूप मायेचे वर्णन भगवंतांनी केले आहे.

**नाहं प्रकाशः सर्वस्य योगमायासमावृतः ।**
**मूढोऽयं नाभिजानाति लोको मामजमव्ययम् ।।२५।।**
**वेदाहं समतीतानि वर्तमानानि चार्जुन ।**
**भविष्याणि च भूतानि मां तु वेद न कश्चन ।।२६।।**
**इच्छाद्वेषसमुत्थेन द्वंद्वमोहेन भारत ।**
**सर्वभूतानि संमोहं सर्गे यान्ति परंतप ।।२७।।**
**येषां त्वन्तगतं पापं जनानां पुण्यकर्मणाम् ।**
**ते द्वंद्वमोहनिर्मुक्ता भजन्ते मां दृढव्रतः'' ।।२८।।**
**जरामरणमोक्षाय मामश्रित्य यतन्ति ये**
**ते ब्रह्म तद्विदुः कृत्स्नमध्यात्मं कर्म चाखिलम् ।।२९।।**
**साधिभूताधिदैवं मां साधियज्ञं च ये विदुः ।**
**प्रयाणकालेऽपि च मां ते विदुर्युक्तचेतसः ।।३०।।**

''आपल्या 'योग'रूप मायेने आच्छादित असल्यामुळे मी सर्वांना (स्वस्वरूपाने) प्रकट (दिसत) नाही. मी अज व अव्यय आहे हे मूढ लोक जाणीत नाहीत.'' ।।२५।।

''भूत, वर्तमान व भविष्यकालाच्या सर्वभूते म्हणजे प्राणी मी जाणतो. पण हे अर्जुना! मला कोणीही जाणीत नाही.'' ।।२६।।

''कारण हे भारता! (इंद्रियांच्या) इच्छा व द्वेष यापासून उद्भवणाऱ्या (सुख-



दुःखादी) द्वंद्वांच्या मोहाने सर्व भूते हे परंतपा! या सृष्टीत भ्रम पावत असतात.'' ।।२७।।

''पण ज्या पुण्यकर्मी लोकांचे पाप संपले ते द्वंद्वाच्या मोहातून सुटून दृढव्रत होत्साते माझी भक्ती करतात.'' ।।२८।।

''जे (याप्रमाणे) माझा आश्रय करून जरामरणांतून म्हणजे पुनर्जन्माच्या फेऱ्यांतून सुटका होण्यासाठी प्रयत्न करतात ते ते 'ब्रह्म', संपूर्ण 'अध्यात्म' आणि सर्व 'कर्म' (म्हणजे काय ते) जाणितात.'' ।।२९।।

''जे 'अधिभूत', 'अधिदैव' व 'अधियज्ञ' यांच्यासह मला जाणतात (म्हणजे हे सर्व मीच आहे अशाप्रकारे) मला जाणतात. ते युक्तचित्त (असल्यामुळे) मरणसमयी देखील मला जाणितात आणि म्हणून मला प्राप्त होतात.'' ।।३०।।

मी योगमायेने आवृत्त आहे असे भगवंत सांगतात. इथे 'योग' म्हणजे अव्यक्त स्वरूप सोडून व्यक्त स्वरूप धारण करण्याची युक्ती. हिलाच वेदांती 'माया' असे म्हणतात. व्यक्त सृष्टी ही मायिक व अनित्य आणि अव्यक्त परमेश्वरच सत्य व नित्य, असा याचा भावार्थ आहे. माया सत्य नसून एक परमेश्वरच सत्य आहे, पण मायेने आवृत्त झाल्यामुळे ईश्वराच्या सत्य स्वरूपाचे यथार्थ ज्ञान न प्राप्त करता अज्ञ भक्त अनेक देव-देवतांची अविधिवत पूजा करतात. आता या मायेतून सुटका कोणाची व कशी होते याचे वर्णनही भगवंतांनी केले आहे.

जे सुख-दुःखादि द्वंद्वांच्या मोहातून सुटून अनन्य चित्ताने भक्ती करतात, ते भगवंताला मृत्यूसमयीही जाणतात. असे भक्त पापरहित होतात. ईश्वराचे तेजोमय, अनंतरूप जाणून त्यांची दृष्टी विशाल होते. निष्कामतेने हृदयात ज्ञानदीप उजळवितो. अज्ञानाचा नाश झालेले भक्त मग जाणतात की, परा-अपरा प्रकृतीचे अधिष्ठान व नियामक केवळ परब्रह्म आहे. सर्वत्र असलेले ब्रह्मतत्त्व जाणल्यामुळे ते मरणसमयीदेखील युक्तचित्त होतात आणि त्यामुळे प्रभूला प्राप्त करतात.

इथे सातव्या अध्यायाची पूर्तता झाली आहे.

**।। श्रीकृष्णार्पणमस्तु ।।**

# अध्याय आठवा

## अक्षरब्रह्मयोग

आठवा अध्याय २८ श्लोकांचा आहे. आकाराने लहान असला तरी अर्थसामर्थ्याने महान आहे. अध्यात्मसाधना किंवा भक्ती ही काही विशिष्ट काळापुरती साधना नसून ती जीवनभर अखंडितपणे करावयाची जीवन-साधना आहे. यामध्ये नित्य-युक्तता असणे हे साधनेचे मर्म आहे. कळत असल्यापासून ज्या ज्या शुभविचारांचे, संस्कारांचे, सत्कृतींचे मनावर परिणाम झालेले असतात, त्यातून आपले आंतरिक व्यक्तिमत्त्व फुलत असते. संपूर्ण जीवन हा अशा विचारांचा, संस्कारांचा परिपाक आहे. मनुष्य जन्मास येताना जसे पूर्वजन्मीच्या संस्कारांचे गाठोडे घेऊन येतो व हे जीवन म्हणजे त्याचेच फलित असते त्याप्रमाणेच बालपणापासून ज्या असंख्य क्रिया - ज्ञानप्राप्ती, पाप-पुण्याच्या कृती इ. त्याच्याकडून घडत असतात, त्या केवळ संस्काररूपानेच मनःपटलावर अखेरपर्यंत राहत असतात. शेवटी आपल्याजवळ राहते ते हेच भांडवल! हीच पुंजी... जीवनभरच्या यातायातीनंतर अखेरच्या क्षणी माणसाला आठवते ती ही संस्कार-संपत्ती!! बाकीची संपत्ती इथेच राहते. पंचमहाभूतात विलीन होणाऱ्या व निश्चेष्ट पडलेल्या प्राणहीन हातातील सोन्याची आंगठीसुद्धा काढून घेण्याची सूचना कोणीतरी करतो व मगच अंत्यसंस्कार पार पडतात. अशी ही मनुष्याची जीवनकहाणी. पण अशा या मर्त्य जीवनात अखेरपर्यंत साथ असते ती ह्या संस्कारांची... वासनांची. आठव्या अध्यायाचा प्रमुख विषय ह्या 'अंतिम क्षणा'संबंधीचा आहे. ही 'प्रयाण-साधना' कशी असावी व त्यामध्ये मनुष्याने जीवनभर कशाचे सातत्य ठेवावे, ह्यासंबंधी या अध्यायात भगवंतांनी खूप मार्गदर्शन केले आहे. जीवनाचा हा शेवटचा क्षण आला की आपल्या सर्व पाप-पुण्यांचा सत्-असत् कर्मांचा संपूर्ण सारीपाट सरकत डोळ्यांसमोर येतो व क्षणात नफा-तोट्याचा हिशोब आपल्या आत्म्याला गवसतो.

आठव्या अध्यायात इतर विषय जे आले आहेत ते अत्यंत संक्षिप्त रीतीने मांडलेले आहेत. सातव्या अध्यायाच्या शेवटच्या श्लोकात भगवंतांनी सांगितले की, जे अधिभूत, अधिदैव व अधियज्ञासहित मला जाणतात ते मत्पर, मच्चित्त झालेले पुरुष मरणकालीही मला जाणतात व म्हणून मला प्राप्त होतात. हे ऐकून अर्जुनाच्या मनात काही शंका उत्पन्न झाल्या. आठव्या अध्यायाच्या प्रारंभी



अर्जुनाने पहिल्या दोन श्लोकांत भगवंतांना सात प्रश्न विचारले आहेत. यातील शेवटच्या सातव्या प्रश्नाच्या उत्तरासाठी भगवान श्रीकृष्णांनी आठव्या अध्यायाचा प्रपंच मांडला आहे. हे सर्वच प्रश्न प्रत्येक साधकाने अभ्यासले पाहिजेत. भक्ताला निःशंक व्हायचे असेल तर ह्या सर्व प्रश्नांचे चिंतन-मनन सातत्याने घडले पाहिजे. हे सात प्रश्न पुढीलप्रमाणे आहेत -

**किं तद् ब्रह्म किमध्यात्मं किं कर्म पुरुषोत्तम**
**अधिभूतं च किं प्रोक्तमधिदैवं किमुच्यते ।।१।।**
**अधियज्ञः कथं कोऽत्र देहेऽस्मिन्मधुसूदन ।**
**प्रयाणकाले च कथं ज्ञेयोऽसि नियतात्मभिः ।।२।।**

"हे पुरुषोत्तमा! ते ब्रह्म म्हणजे काय? अध्यात्म म्हणजे काय? कर्म म्हणजे काय अधिभूत कशाला म्हणावयाचे? आणि अधिदैवत कशाला म्हणतात? अधियज्ञ कसा असतो? आणि या देहात हे मधुसूदना! कोण अधियज्ञ आहे? आणि इंद्रियनिग्रह करणारे अंतकाळी तुम्हांस कसे ओळखतात? (हे मला सांगा.)"

सातव्या अध्यायाच्या अखेर 'अधिभूतं' आदी जे शब्द भगवंतांनी उच्चारिले त्यावरून अर्जुनास त्यांचा अर्थ जाणण्याची इच्छा होऊन त्याने वरील प्रश्न विचारले. 'अधि' हा उपसर्ग कोणत्याही शब्दाच्या मागे असला म्हणजे त्याचा अर्थ - 'तद्विषयक' 'त्या बाबतीतले', 'त्यांचे ठायी असणारे' असा होतो. या अर्थाप्रमाणे 'अधिदैव' म्हणजे अनेक देवतांचे ठायी असणारे तत्त्व होय. पहिल्या सहा प्रश्नांची उत्तरे सदर शब्दांच्या केवळ व्याख्या देऊन संक्षिप्त रीतीने दिली आहे. भगवंत म्हणतात,

**अक्षरं ब्रह्म परमं स्वभावोऽध्यात्ममुच्यते ।**
**भूतभावोद्भवकरो विसर्गः कर्मसंज्ञितः ।।३।।**
**अधिभूतं क्षरो भावः पुरुषश्चाधिदैवतम् ।**
**अधियज्ञोऽहमेवात्र देहे देहभृतां वर ।।४।।**

"सर्वांहून परम असे जे अक्षर म्हणजे कधीही नाश न पावणारे तत्त्व ते ब्रह्म, (आणि) प्रत्येक वस्तूचा जो मूळ भाव (स्व-भाव) त्यास अध्यात्म असे म्हणतात. (अक्षर ब्रह्मापासून) भूतमात्रादी (चराचर) पदार्थांची उत्पत्ती करणारा जो विसर्ग म्हणजे सृष्टिव्यापार त्याचे नाव कर्म." ।।३।।

"(उत्पन्न झालेल्या सर्व भूतांची) क्षर म्हणजे नामरूपात्मक किंवा नाशवंत अशी जी स्थिती ते अधिभूत, आणि या (पदार्थांत) जो पुरुष म्हणजे सचेतन अधिष्ठाता तो अधिदैव, (ज्याला) अधियज्ञ (म्हणजे सर्व नामरूपात्मक यज्ञांचा अधिपती म्हणतात तो) मीच हे देहधाऱ्यांत श्रेष्ठा! या देहाच्या ठायी (अधियज्ञ) आहे." ।।४।।

ही पहिल्या सहा प्रश्नांची उत्तरे 'ब्रह्म म्हणजे काय?' याचे उत्तर भगवंतांनी

तीन शब्दांत दिले, 'अक्षरं ब्रह्म परमं.'' ब्रह्म अक्षर व परम आहे. जे क्षर नाही व जे निर्गुण, निराकार आहे, ते अक्षर ब्रह्म. परम म्हणजे श्रेष्ठ.

वैदिक धर्मात गीता, उपनिषदे व ब्रह्मसूत्रे यांना 'प्रस्थानत्रयी' म्हणतात. आत्मसाक्षात्कारासाठी ज्या मार्गाने जावे लागते, त्याला 'प्रस्थान' म्हणतात. गीतेमध्ये सर्व उपनिषदांचे सार आहे. ऋषिमुनींना ध्यानावस्थेत जे ब्रह्मविषयक विचार स्फुरले ते त्यांनी उपनिषदांमध्ये मंत्ररूपाने रचून शिष्यांना सांगितले. गुरू-शिष्याच्या परंपरेतून ते विचार आपणापर्यंत येऊन पोचले म्हणून उपनिषदांना 'श्रुती' म्हटले जाते. श्रुतीमधील सनातन धर्माची शाश्वत मूल्ये आचरणात कशी आणावीत, हे शिकविण्याचे काम, ज्या ग्रंथांनी केले, त्यांना 'स्मृती' म्हणतात. उपनिषदे अनेक आहेत. काही वेळा एका उपनिषदातील विचार दुसऱ्या उपनिषद-विचाराहून भिन्न वाटतो. तेव्हा उपनिषदवाक्यांची एकवाक्यता करण्याचे काम हाती घेऊन व्यासांनी 'ब्रह्मसूत्रे' रचली व सर्व संदेह दूर केले. म्हणून ही सूत्रे 'न्यायप्रस्थान' म्हणूनही गणली जातात.

या ब्रह्मसूत्रांच्या आरंभी सूत्रकारांनी 'अथातो ब्रह्मजिज्ञासा' असा संकल्प करून पहिल्या प्रथम सृष्टिकर्त्या ब्रह्माविषयी विचार मांडले आहेत. 'जन्माद्यस्य यतः' या सूत्रात असे म्हटले आहे की, या जगाची उत्पत्ती, स्थिती व प्रलय यांना जे कारण आहे ते ब्रह्म होय. ब्रह्म, परब्रह्म, परमात्मा, आत्मा या सर्व शब्दांचा अर्थ एकच आहे. जगाच्या उत्पत्ती, स्थिती व प्रलय यांस परमात्मा-परब्रह्माच कारण आहे ही गोष्ट उपनिषदांनीही वारंवार सांगितली आहे. काही अंश असे -

**यतो वा इमानि भूतानि जायन्ते ।**
**येन जातानि जीवन्ति ।**
**यत्प्रयन्त्यभिसंविशन्ति ।**
**तद्विजिज्ञासस्व, तद् ब्रह्मेति ।** (तैत्तिरीय उप.३-१)

''ज्यापासून ही सर्व भूते उत्पन्न होतात, ज्याच्यामुळे उत्पन्न झाल्यावरती जिवंत राहतात व मरणकाळी ज्यामध्ये लीन होतात ते ब्रह्म होय.'' **सकारणं करणाधिपाधिपो न चास्य कश्चित् जनिता न चाधिपः ।**(श्वेताश्वतर उप.-९)

''तो परमेश्वरच जगाचे कारण आहे. सर्व जीवांचा अधिपती तोच आहे. त्याला उत्पन्न करणारा किंवा त्याचा अधिपती दुसरा कोणीही नाही.

**एष योनिः सर्वस्य ।** (मांडूक्य उप. ६)

हे परब्रह्मच संपूर्ण जगाचे कारण आहे. मुंडक, केनोपनिषद, प्रश्नोपनिषद... अशा सर्वच उपनिषदांमध्ये परब्रह्म महिमा वर्णन केला आहे. ऋग्वेद, यजुर्वेद यांतही ब्रह्म हेच जगाचे कारण सांगितले आहे. वेद सांगतात की प्रथम आत्मा एकमेव होता. त्याने बहुविध होण्याचा संकल्प केला व मायेने (परा, अपरा प्रकृतिद्वारा) जगाची निर्मिती केली. ज्याचे निमित्तोपादान - कारण तोच म्हणून



तो 'एकमेवाद्वितीयं आत्मा' त्यालाच आपण परब्रह्म, परमात्मा म्हणतो व शरीरस्थ आत्म्याला जीव किंवा जीवात्मा म्हणतो.

**एको देवः सर्वभूतेषु गूढः ।**
**सर्वव्यापी सर्वभूतान्तरात्मा ।**
**कर्माध्यक्षः सर्वभूताधिवासः**
**साक्षी चेता केवलो निर्गुणश्च ।।** (श्वेता. ६-११)

''परमात्मा एकच एक असूनही 'सर्वव्यापी' आहे. तो सर्वांच्या कार्यांना 'चेतना' देतो व त्यांच्या कर्मांचे साक्षित्व ठेवतो. त्याच्याच अध्यक्षतेखाली विविध नामरूपांनी ही सृष्टी नटली आहे. तत्त्वतः तो एकच निरनिराळ्या रूपांत अभिव्यक्त झाला आहे. आणि त्याच्या माया-शक्तीने रचलेली सृष्टी जरी त्रिगुणात्मक असली तरी तो मात्र 'स्वस्वरूपी' निर्गुण म्हणजे 'त्रिगुणांच्या अतीत' केवळ शुद्ध स्वरूपात स्थित आहे.''

ईशावास्योपनिषदाच्या पहिल्याच श्लोकात ही संकल्पना सुंदर रीतीने व्यक्त झाली आहे.

**ईशावास्यमिदं सर्वं यत्किंच जगत्यां जगत् ।**

''ह्या जगात जे काही जीवन आहे ते सर्व ईश्वरानेच वसविले आहे. ते ईश्वराने व्याप्त आहे.''

गीतेचेही प्रतिपादन अशाच स्वरूपाचे आहे. परमात्मा-परब्रह्म बीजरूपाने वा साररूपाने वस्तुमात्रात विद्यमान आहे. ही गोष्ट गीतेतील अनेक श्लोकांत स्पष्ट झाली आहे. विस्तारभयामुळे केवळ अशा काही श्लोकांचे अध्याय व श्लोक क्रमांक येथे उद्धृत करतो.

(अध्याय सातवा श्लोक ७ ते १४) (अध्याय नववा श्लोक ४, १०, १७) (अध्याय दहावा श्लोक ८, ३२) (अध्याय चौदावा श्लोक ३-४) (अध्याय तेरावा श्लोक २६) (अध्याय पंधरावा श्लोक १२, १३, १४, १५) (अध्याय अठरावा श्लोक ६१)

माळेतील मणी ज्याप्रमाणे दोऱ्यात ओवलेले असतात त्याप्रमाणे परमात्मतत्त्व वा परब्रह्म सर्व वस्तुमात्रात विद्यमान आहे. हाच सर्वांच्या अंतर्यामी राहून त्यांचे भरणपोषण करतो. हा वरील सर्व श्लोकांचा आशय आहे.

असा परमात्मा भक्तांसाठी सगुणही होतो. सगुणाची पराकाष्ठा म्हणजे सर्वत्र भगवान पाहणे. व्यक्तातून अव्यक्ताकडे म्हणजे सगुणाकडून निर्गुणाकडे जायचे ध्येय साधकांचे असले पाहिजे. आपल्या तत्त्वज्ञानात मूर्तिपूजा-सगुणपूजा जी आली आहे, त्याचे मर्म हेच आहे. चित्तैकाग्रता साधण्यासाठी सगुणमूर्ती ठेवायची. ही स्थूलपूजा. त्यानंतर गुणपूजा व शेवटी तत्त्वपूजा असा क्रम साधला तरच व्यक्तातून अव्यक्ताकडे जाता येते. भक्तीची ही शास्त्रीय बैठक समजून

घेऊनच आराधना केली पाहिजे. सगुण व निर्गुण ही दोन्ही विलक्षण रूपे आहेत. ''सगुण निर्गुण दोन्ही विलक्षण''. निर्गुण, निराकार, सगुण होतो हेच विलक्षण आहे. श्री गणपतीची सगुणमूर्ती उत्सवासाठी आपण आणतो, पाच दिवस त्याची पूजा करतो व शेवटी त्याचे विसर्जन करतो. हे सगुणातून निर्गुणाकडे जाणे आहे. जो भगवंत मी मूर्तीत पाहत होतो, तो आता जगात सर्वत्र पाहायला शिकणे ही आत्मौपम्य दृष्टी येणे व 'जे जे भेटे भूत । ते ते मानिजे भगवंत' अशा व्यवहाराने जगाकडे पाहणे हे भक्तीचे ध्येय असले पाहिजे. मूर्तिपूजेचे, सगुणत्वाचे शास्त्र ही वैदिक धर्माची आपल्याला मोठी देन आहे.

असा परमात्मा शब्दहित, स्पर्शरहित, रूप-रस-गंध रहित असा जरी असला तरी तोच एकमेव ज्ञेय (जाणण्यायोग्य) आहे, असे सर्व सूत्रकारांनी सांगितले आहे. गीतादेखील सांगते की, एक परमात्मतत्त्वच तेवढे ज्ञेय आहे आणि ते फार दूर नाही, तर आपल्या हृदयातच स्थित आहे. **''ज्ञानं ज्ञेयं ज्ञानगम्यं हृदि सर्वस्य विष्ठितम्''** (अध्याय १३-१७) गीता या परब्रह्माविषयी असेही सांगते की हे परमात्मतत्त्व जाणल्यानंतर या जगात दुसरे जाणण्यायोग्य काहीच उरत नाही.

**''यत् ज्ञात्वा नेह भूयोऽन्यत् ज्ञातव्यं अवशिष्यते ।''** (गी. ७.२)

केनोपनिषदाच्या ऋषीने ब्रह्माची व्याख्या फार सुरेख केली आहे. ते म्हणतात, ''जे वाणीने बोलले जात नाही, पण ज्याने वाणी बोलू शकते. मनाने ज्याचे चिंतन करता येत नाही, पण जे आपणा सर्वांचे चिंतन करते, जे चक्षूंनी पाहता येत नाही; पण ज्याच्यामुळे चक्षू पाहू शकतात. जे आपल्याला आपल्या कानांनी ऐकता येत नाही पण ज्याच्या शक्तीमुळे कान ऐकू शकतात. तसेच जे प्राणांमुळे हालचाल करीत नाही पण ज्याच्या शक्तीमुळे प्राण हालचाल करण्यास समर्थ होतात ते ब्रह्म होय.''

आठव्या अध्यायात ही जी प्रश्नोत्तरे आहेत ती सूत्ररूपाने गीताकारांनी मांडली आहेत. भारताच्या आध्यात्मिक इतिहासात, ज्या ज्या ग्रंथरचना झाल्या त्यांची भाषा सूत्रे, श्लोक व मंत्र यांच्या माध्यमातून प्रतिपादल्या आहेत. संपूर्ण दर्शनशास्त्राची भाषा ही सूत्ररूपात आहे. सूत्र म्हणजे कमीत कमी शब्दांत, गहन आशयाचा विस्तार प्रकट करणे. वैज्ञानिक भाषेत फॉर्म्युला देणे म्हणजे सूत्र. पातञ्जलींनी संपूर्ण अष्टांगयोग १९६ सूत्रांच्या रूपाने सांगितला. सूत्रे ही बीजरूपासारखी असतात. त्याचा विस्तार वटवृक्षासारखा होत असतो. उदा. दर्शनशास्त्रामध्ये एक प्रश्न आहे की, भगवंताने हे जग का निर्माण केले? सूत्ररूपात उत्तर एवढेच आहे की – ''भोगापवर्गार्थं दृश्यम्'' – ''जीवांनी कर्मभोग भोगावेत'' - भोग व अपवर्गभोग भोगण्यासाठी व कर्मबंधनातून मुक्त होऊन मोक्ष मिळविण्यासाठी या सृष्टीची रचना केली असे उत्तर. या उत्तराचा विस्तार ग्रंथरूपाने करता येईल. प्राचीन ऋषिमुनींनी आपली अनुभूती व ज्ञान, अशा



मार्मिक सूत्ररूपात कथन केली आहे. तीही काव्यरूपात. गीता हेसुद्धा काव्यच आहे. भगवंतांनी आपल्या मुखारविंदातून गायिलेले गीत हीच गीता. इथेसुद्धा अशाच मंत्ररूपाने हे तत्त्वज्ञान मांडले आहे. अर्जुनाच्या प्रश्नाला - 'ब्रह्म काय आहे?' उत्तरही असेच सूत्ररूपात 'अक्षरं ब्रह्म परमं.'' - परब्रह्म ते तत्त्व आहे की जे अक्षर आहे. उपनिषदांनी याचे वर्णन असेच केले - ''रसो वै सः'' - परमात्मा एक रस आहे, तो रस की जो जीवनात आला तर संपूर्ण जीवनच रसमय होऊन जाईल. महान पुरुषांचे संपूर्ण जीवन, त्यांनी केलेली महान कार्ये, त्यांची ग्रंथरचना, त्यांचे बोलणे, चालणे हे सारेच रसपूर्ण असते, कारण ते परमात्म्याशी युक्त झाले होते. परमात्मा रसपूर्ण आहे. म्हणून त्यांचे जीवनही तसेच.

अशा परब्रह्माची व्याख्या उपनिषदांनी करताना 'तत्' म्हणून त्याला संबोधिले. कारण परब्रह्माला ओळखणे महान कठीण आहे. केवळ आपण अंगुलीनिर्देश करून त्याचा 'ते' म्हणून उल्लेख करू शकतो. जे शब्दामध्ये वर्णन करता येत नाही, वाणीने बोलता येत नाही म्हणून अनिर्वचनीय...

भगवान श्रीकृष्णांनी जेव्हा आपले विराट दर्शन दाखविले त्या वेळी अर्जुनाची मती कुंठित झाली. संख्येचे भान राहिले नाही, गणना मर्यादेबाहेर झाली, बुद्धीच्या पलीकडे सर्व दृश्ये जात होती. इंद्रियांच्या शक्तीबाहेरचे हे विराटरूप होते. म्हणून मन-बुद्धीच्या कह्यात न येणाऱ्या या रूपाला अगोचर म्हटले गेले.

अशा या अक्षर परब्रह्माला ओळखण्यासाठी भगवंतांनी मनुष्याला 'जिज्ञासा' दिली. त्या कुतूहलाच्या, चौकस वृत्तीने तो निदान याची ओळख तरी करून घेऊ शकतो. अर्जुनाचे गीतेतील सर्व प्रश्न या जिज्ञासू वृत्तीचे फलित आहे. म्हणून सत्शिष्याने गुरुकडे जाऊन, विनम्रतेने प्रश्न विचारून हे ज्ञान प्राप्त करावे, हा गीतेचा आग्रह आहे. जिज्ञासा ही प्रचंड शक्ती आहे. याच शक्तीने विश्वाची गूढ रहस्ये उकलण्याचा वैज्ञानिकांनी सतत प्रयत्न केला आहे. अध्यात्म व विज्ञान या दोघांचाही प्रयत्न हा सत्यशोधनाचा आहे. जिज्ञासा ही मूलभूत प्रेरणा हे भगवंताचे वरदान आहे. म्हणून मोठ्या विद्वान, ज्ञानी पुरुषाकडे जाऊन, सत्संगतीने हे ज्ञान प्राप्त केले पाहिजे. या ज्ञानानेच त्या अक्षर परब्रह्माला जाणता येते. प्रखर श्रद्धा व जिज्ञासा असेल, तर हे ज्ञान संतकृपेने कसे प्राप्त होते याचा एक दाखला म्हणजे महात्मा बुद्धांच्या सारिपुत्त या शिष्याचे उदाहरण!

सारिपुत्त हा एक सामान्य साधक होता. पण भगवान बुद्धांवर त्याची निःस्सीम श्रद्धा होती. बुद्धांना संपूर्ण शरणागत होऊन त्याने बुद्धांचे प्रेम प्राप्त केले व ज्ञानही. हे ओळखून बुद्धांनी त्याला मिळविलेले ज्ञान जगाला देण्यासाठी बाहेर पाठविले. जिथे जिथे जाईल तेथे तेथे प्रवचनापूर्वी तो विशिष्ट दिशेला नमस्कार करायचा. शिष्यांनी सारिपुत्तना यासंबंधी विचारले, ''तुम्ही जेव्हा नमस्कार करता त्या वेळी तिथे मंदिर किंवा कोणतेही धार्मिक स्थळ नसते मग हा नमस्कार

कुणाला करता?'' सारिपुत्तानी उत्तर दिले, ''ज्यांनी मला ज्ञानप्रकाश दिला, ज्यांनी या सामान्य शरीरात अमृत भरले त्या माझ्या गुरुदेवांना! ते जिथे असतील त्या दिशेला मी प्रणाम करतो.'' भगवान बुद्धांच्या कार्यक्रमांची सर्व माहिती, त्यांनी आधीच नोंद करून घेतलेली असे. अक्षर परब्रह्माच्या ज्ञानासाठी अशी श्रद्धा, समर्पण, प्रेम आवश्यक असते.

या विराट ब्रह्मांडाची सुव्यवस्थित रचना करणारा, या सृष्टीत नानाविध रंग-गंध यांची शिंपण करणारा तो अक्षर परब्रह्म किती कल्पक, सुंदर असेल! तो कळायला जरी अवघड असला, तरी सारिपुत्तासारखे आपण त्या दिशेला निदान वंदन तरी करू. कारण तो सर्वशक्तिमान, सर्वज्ञ आहे व मनुष्य अल्पज्ञ व मर्यादित शक्तीचा आहे. तो अनंत, अपार आहे म्हणून वेदसुद्धा 'नेति नेति' म्हणाले. अशा अक्षर पुरुषाला केवळ भक्तीनेच जाणता येईल. या नरदेहात तो अंशरूपाने आहे. तो विराट अक्षर परब्रह्म अंशी आहे व आपण त्यांचे अंश आहोत. म्हणून आपला सर्वांचा खरा पिता तोच आहे. आपण खरे म्हणजे 'अमृतपुत्र आहोत पण अज्ञान व अविद्येमुळे जीवरूप झालो आहोत. मनुष्य जन्माचे खरे सार्थक नारायणस्वरूप होण्यात आहे. 'नर करणी करे तो नरका नारायण हो जाये।' याच जन्मात ते अमृतस्वरूप प्राप्त करण्याचे सामर्थ्य भगवंताने मनुष्याला दिले आहे.

याप्रमाणे आपण 'अक्षरं परमं ब्रह्म' या ब्रह्माच्या स्वरूपाचा थोडासा विचार केला.

आता दुसऱ्या प्रश्नाचे उत्तर. 'अध्यात्म' म्हणजे 'स्वभावोऽध्यात्ममुच्यते' - शरीराचे सर्व व्यवहार ज्या चैतन्यशक्तीमुळे चालतात, त्याला आपण जाणू शकत नाही. ह्या मृण्मय देहात तो चिन्मय आहे, म्हणून हे मातीचे खेळणे नाचते. ती शक्ती ज्या वेळी देहातून निघून जाते, त्या वेळी हा देह पंचतत्त्वात विलीन होतो. ह्या चैतन्याला आपण 'प्रत्यगात्मा' असे म्हणतो. त्या परब्रह्म तत्त्वाचा थोडा अंश म्हणजे हा प्रत्यगात्मा. त्या अंशाची शक्ती घेऊन तो ज्या वेळी अहंकारासहित १७ तत्त्वांच्या (५ ज्ञानेंद्रिये + ५ कर्मेंद्रिये + पंचप्राण, मन, बुद्धी) झालेल्या लिंगदेहाबरोबर कार्य करू लागतो, त्या वेळी त्याला 'जीवात्मा' म्हणतात. ज्या चैतन्यशक्तीमुळे जीवात्मा काम करतो ती शक्ती म्हणजेच 'स्वभाव' तिला ओळखणे व त्या शक्तीला जाणून घेणे, ती सतत आपल्याबरोबर आहे ह्याची अनुभूती घेणे, ती म्हणजे 'अध्यात्म'. स्वभाव म्हणजे स्व अधिक भाव. स्व म्हणजे मी स्वतः व त्याचा भाव म्हणजे स्वभाव. प्रत्यगात्मा व परमात्मतत्त्व यांत भेद नाही. सर्वव्यापी ईश तत्त्वाचा अल्पसा अंश म्हणजे प्रत्यगात्मा. अशा या प्रत्यगात्म्याचे स्वरूप कसे आहे, याचा विचार आपण पहिल्या सहा अध्यायांत केला आहे. **''ईश्वरः सर्वभूतानां हृद्देशेऽर्जुन तिष्ठति ।''** (१८-६१). या प्रमाणे



दोन्हीही एकच आहेत. ''आत्मनि अधि इति अध्यात्मं'' जो आत डोकावून पाहतो, 'कोऽहं'चा जो अभ्यास करतो तो आध्यात्मिक! तिसरा प्रश्न कर्मासंबंधीचा! ''भूतभावोद्भवकरो विसर्गः कर्मसंज्ञितः ।'' जे भूतांची उत्पत्ती व नाश करते ते 'कर्म'. भूतमात्राच्या उन्नतीसाठी केलेला जो प्रयत्न त्याला कर्म म्हणतात. कोणतेही दैनंदिन, नित्य काम, 'कर्म' ह्या संज्ञेला पात्र नाही. तर मनुष्याला उन्नत करण्यासाठी केलेला त्याग म्हणजे कर्म. ऊर्ध्वगतीला नेण्यासाठी ईश्वराला अर्पण करून केलेले काम हे कर्म. मग असे जे कर्म आहे ते ईश्वराचा प्रसाद बनते. भगवान शंकराचार्य म्हणतात,

**''यद् यद् कर्म करोमि तत्तदखिलं शंभोस्तवाराधनम् ।।''**

''हे शंभो! मी जे जे कर्म करतो ते ते सर्व तुझ्या आराधनेसाठी आहे.''

कर्म करता करता हे संपूर्ण जीवन-पुष्प त्या भगवंताला अर्पण करणे हीच 'भक्ती'. 'विसर्ग' म्हणजे सोडणे, त्याग करणे. भगवंत व मी याच्या आड येणाऱ्या सर्व गोष्टींचा त्याग करणे म्हणजे उन्नत होणे.

आता चौथा प्रश्न - ''अधिभूतं च किं प्रोक्तम् ?'' भगवंत उत्तर देतात, ''अधिभूतं क्षरो भावः ।'' नाशवंत पदार्थ 'अधिभूत' होय. या जगात जे जे दृष्टीला पडते ते ते नाशवंत व ते सर्व अधिभूत!

**हे उपजे आणि नाशे । ते मायावशे दिसे ।**
**येऱ्हवी तत्त्वता वस्तु जे असे । ते अविनाशचि ।।** (ज्ञाने. १०५)

''जे जे उत्पन्न पावते ते ते सर्व नाश पावते. पण ह्या सर्व वस्तूंत जे आत्मतत्त्व आहे,'' तेच केवळ अविनाशी आहे. ही सर्व अपरा प्रकृती. हे शरीर क्षणाक्षणाला बदलत असते. पण ह्या शरीरात असलेली वासना, चैतन्य, बुद्धी तशीच राहते. ह्या ब्रह्मांडात केवळ ईशतत्त्वच अखंड आहे. म्हणून भगवान अनुत्पन्न आहे, अनध्यस्त आहे.

पाचवा प्रश्न 'अधिदैव' म्हणजे काय?' भगवान सांगतात, ''पुरुषश्चाधिदैवतम्'' - जी परा प्रकृती आहे ती अधिदैव. सहावा प्रश्न 'अधियज्ञ' म्हणजे काय? ''अधियज्ञोऽहमेवात्र देहे देहभृतां वर.'' भगवान सांगतात, ''मीच अधियज्ञ आहे.'' आपल्या या देहात जे कर्म होते, त्याचा अधिष्ठाता भगवंत आहे. जे कर्म फलापेक्षा सोडून केले जाते, त्या यज्ञीय भावनेने केलेल्या कर्माला यज्ञ म्हणतात. अशा कामाची जाहिरात होत नाही. 'वैश्वानर' होऊन या देहात तो आपले अन्न पचवितो. देहाच्या सर्व क्रिया त्याच्याच सत्तेमुळे होतात. तो जोपर्यंत आहे तोपर्यंत हे मातीचे खेळणे पळते. त्या भगवंताचे अस्तित्व जाणणे व तसेच यज्ञीय भावनेने काम करणे ही त्याच्याबद्दलची कृतज्ञता दाखविणे होय.

- हे सर्व प्रश्न तत्त्वज्ञानासंबंधीचे आहेत. या अध्यायाचे सारभूत म्हणजे सातवा प्रश्न, ज्यांचा ऊहापोह मी पहिल्या परिच्छेदात विस्तृतपणे केला आहे.

आता सातवा प्रश्न! **'प्रयाणकाले च कथं ज्ञेयोऽसि नियतात्मभिः ।'** आणि इंदियनिग्रह करणारे अंतकाळी तुम्हांस कसे ओळखतात? या प्रश्नाचे उत्तर म्हणजे आठवा अध्याय. पाचव्या श्लोकांपासूनचे सर्व श्लोक या उत्तराचा वेध घेतात.

**'अंते मतिः सा गतिः'** - मरणाच्या वेळी जशी आपली बुद्धी असेल तशी आपणास गती मिळेल. हे या उत्तराचे सार... पण हे इतके सोपे नाही. केवळ मृत्युसमयी मी ईश्वराचे नाव घेईन, जप करीन व उत्तम गतीचा अधिकारी होईन तर उगाच जन्मभर भजन-कीर्तन-ध्यान अशा अनेकविध साधनांचा अभ्यास का करा? भगवंतांनी दिलेल्या आश्वासनाप्रमाणे प्रयाणकाळाच्या वेळीच त्याच्या नावाचा जप केला म्हणजे झाले... अशा भ्रमात राहणाऱ्या मूढ जनांसाठी हा सर्व श्लोकांचा प्रपंच भगवंतांनी मांडला आहे. राष्ट्रपिता महात्मा गांधींच्या मुखात शेवटी 'हे राम' असे शब्द येऊन त्यांनी भगवंताचे स्मरण केले व प्राण सोडला. महात्मा गांधींनी आपल्या आत्मचरित्रात लिहिले आहे की, 'जीवनभर मी गीतेच्या तत्त्वांचे आचरण केले.' गांधीजींनी सत्य-अहिंसा-प्रेम या सोळाव्या अध्यायातील दैवी गुणांनुसार संपूर्ण जीवन घालविले. म्हणूनच अंत्यसमयी त्यांच्या मुखात ईश्वराचे नाव होते. अशी ईश्वराची आठवण होण्यासाठी जीवनभरची साधनाच आवश्यक आहे; अपरिहार्य आहे. जी स्थायी वृत्ती जीवनभर जोपासिली असेल, ज्या-ज्या गोष्टींचे अखंडपणे चिंतन केले असेल, ज्याचा ध्यास सतत झालेला असेल, तीच गोष्ट जीवनाच्या अंतिम क्षणी ओठावर येते. शेवटचा श्वास हा त्या जीवनभरच्या सातत्याने केलेल्या कर्मांचा, संस्कारांचा, वासनांचा, वृत्तींचा परिपाक आहे. यापेक्षा वेगळे काही घडत नाही. हे कटु सत्य आहे. हे सत्य समजावण्यासाठी भगवंत म्हणतात -

**अंतकाले च मामेव स्मरन्मुक्त्वा कलेवरम् ।**
**यः प्रयाति स मद्भावं याति नास्त्यत्र संशयः ।।५।।**
**यं यं वापि स्मरन्भावं त्यजत्यंते कलेवरम् ।**
**तं तमेवैति कौंतेय सदा तद्भावभावितः ।।६।।**
**तस्मात् सर्वेषु कालेषु मामनुस्मर युध्य च ।**
**मय्यर्पितमनोबुद्धिर्मामेवैष्यस्यसंशयम् ।।७।।**
**अभ्यासयोगयुक्तेन चेतसा नान्यगामिना ।**
**परमं पुरुषं दिव्यं याति पार्थानुचिंतयन् ।।८।।**

"आणि जो अंतकाळी माझेच स्मरण करीत देह सोडतो, तो माझ्याच स्वरूपाला येऊन पोचतो, यात संशय नाही." ।।५।।

"अथवा हे कौंतेया! सदा म्हणजे जन्मभर ज्या ज्या भावाचे स्मरण करीत अखेरीस देह सोडतो, त्या त्याच (भावाला) तो जाऊन पोचतो." ।।६।।



"म्हणून सर्वकाली म्हणजे नेहमीच माझे स्मरण करीत जा, आणि युद्ध कर. माझ्या ठायी मन व बुद्धी अर्पण केलीस म्हणजे मलाच येऊन पोचशील यात संशय नाही." ।।७।।

"हे पार्था! चित्त दुसरीकडे जाऊ न देता अभ्यासाच्या साहाय्याने स्थिर करून दिव्य परमपुरुषाचे ध्यान करीत असले म्हणजे त्याच पुरुषास जाऊन पोचते." ।।८।।

हे सर्व इतके स्पष्ट आहे की, प्रत्येक शब्द हा सिद्धांत आहे. अक्षरांना मंत्राचे सामर्थ्य आहे. गीतेचे जीवनविषयक तत्त्वज्ञान हे आपल्या आचारधर्माचे रहस्य सांगते. सर्व उपनिषदांचे सार म्हणजे गीता असल्यामुळे हे सिद्धांत मंत्ररूपानेच प्रतिपादिले आहेत. ही गीतेची खासियत आहे.

प्रयाणकालाचा क्षण येऊन ठेपला की, अंतर्यात्मा जीवनाची शिल्लक आठवू लागतो. संपूर्ण जीवनाचा सारीपाट क्षणभरात डोळ्यासमोर येतो. जीवनात हातून घडलेली पाप-पुण्ये, सत्कर्म-कुकर्म, सत्-असत् यांच्या संस्कारांचे फलित आपल्या हाती येते. जसा जमा-खर्चाचा ताळेबंद ठेवून केवळ नफा व केवळ तोटा याचे गणित मांडून शिल्लक काढली जाते व ती शिल्लक म्हणजेच आपल्या जीवनाची पुंजी व पुढील जन्माची शिदोरी! कर्मे घडून जातात पण शिल्लक राहतात ती स्मृतिचिन्हे व संस्कार. ही संस्कार-संपत्ती किती आहे व कशी आहे यावरून जीवनाची कृतार्थता, साफल्य याचा कस लागतो. अंतिम क्षण ही आपल्या जीवनाची अंतिम परीक्षा म्हणजे कसोटीच आहे. मरणाच्या वेळी जर धनावर वासना असेल तर संपूर्ण जीवनभर पैसा-पैसा म्हणूनच प्रत्येक क्षण घालविला असेल असे सिद्ध होईल. स्त्रैणपणाने जीवन व्यतीत केलेले असेल तर अखेरच्या क्षणी स्त्रीचा व कामजीवनाचाच विचार असेल. पुत्राचा किंवा घराचा विचार सतत झालेला असेल तर प्रयाणकाळी याचीच चिंता मनाला होईल व असा एकच प्रमुख भाव, संस्कार साररूपाने शिल्लक राहतो व तशीच गती प्राप्त होते म्हणून सुरुवातीस म्हटल्याप्रमाणे 'अंते मतिः सा गतिः ।'

म्हणून प्रयाणकाळीचे स्मरण हे सर्व जीवनाचे सार-फलित होय. हा शेवटचा क्षण मधुर व्हावा म्हणून संत-महात्म्यांनी जीवनभर साधना केली. या शेवटच्या क्षणाची सार्थकता, कृतार्थता जाणून संत तुकाराम महाराज म्हणतात,

**याचसाठी केला होता अट्टाहास ।**
**शेवटचा दिस गोड व्हावा ।।१।।**
**आता निश्चितीने पावलो विसावा ।**
**खुंटलिया धावा तृष्णेचिया ।।२।।**

"तृष्णेची धाव संपल्यामुळे मी आता निश्चिंत झालो आहे. हा शेवटचा

दिवस गोड व्हावा म्हणूनच मी जीवनभर साधना-तपश्चर्या केली,'' असे तुकाराम महाराज म्हणतात. ज्याचा शेवट गोड ते सारेच मधुर. संपूर्ण जीवनाचा हिशोब मांडताना हे शेवटचे गोड उत्तर येईल असेच गणित मांडले पाहिजे. तृष्णा-वासना किती संयमित असाव्यात हे आपल्याला भक्तिशास्त्र दर्शविते. नाहीतर सत्य हे आहे की तृष्णा कधीही जीर्ण होत नाहीत, आपणच जीर्ण होतो; आशा-अपेक्षा कधीही मिटत नाहीत, आपणच मिटत असतो; भोग आपण भोगत नाही, भोगच आपल्याला भोगत असतात; याचे भान ठेवून जर जीवनाचे गणित मांडले, अट्टाहास केला, तर अंतिम उत्तर गोड, हे निश्चित! आणि हे उत्तर हीच पुढील पुनर्जन्माची सुरुवात. आठव्या अध्यायात भगवान श्रीकृष्णांनी हा जीवनसिद्धांत स्पष्टपणे मांडला आहे. प्रयाणकाळी जो भाव किंवा जो विचार उमटला त्यानुसारच तो भाव पुढील जन्मात प्रभावी, बलवत्तर ठरतो. पुढच्या प्रवासाची हीच शिदोरी. जन्मभर जे मनात असते, ते मरणकालीही सुटत नाही, असे सांगून मरणकालीच नव्हे तर जन्मभरही परमेश्वराचे स्मरण व उपासना करण्याची आवश्यकता सिद्ध केली आहे.

**'तस्मात्सर्वेषु कालेषु मामनुस्मर युध्य च'** हा जीवनमंत्र आहे. हीच साधना आहे. भगवद्गीतेत संसार सोडून केवळ भक्तीच प्रतिपाद्य आहे, असे म्हणणाऱ्यांनी या श्लोकातील हा सिद्धांत अभ्यासावा. भगवद्भक्ताने स्वधर्माप्रमाणे प्राप्त झालेली सर्व नियत, विहित कर्मे निष्कामबुद्धीने पार पाडावीत, हे गीताशास्त्र सांगते. 'युध्य च' म्हणजे स्वधर्माप्रमाणे युद्ध कर, कर्तव्य कर. हे करीत असताना माझे सतत चिंतन कर, असे अर्जुनाच्या निमित्ताने आपणा सर्वांना भगवंतांनी प्रतिपादिले आहे. ज्ञानेश्वरमाऊली यावर निरूपण करतात व सोप्या शब्दांत हाच विचार मांडतात -

**आणि मरणी जया जे आठवे । तो तेचि गतीते पावे ।**
**म्हणोनि सदा स्मरावे । मातेंची तुवां ।।७५।।**
**तू मन बुद्धि साचेंसी । जरी माझिया स्वरूपी अर्पिसी ।**
**तरी मातेंची गा पावसी । हे माझी भाक ।।७९।।**

''आणि मरणसमयी ज्यास जी वस्तू आठवते त्याच गतीला तो जातो, असे आहे. म्हणून तू नेहमी माझे स्मरण कर. तू मन-बुद्धी ही खरोखर माझ्या स्वरूपात अर्पण करशील, तर मग माझ्याशी एकरूपच होशील. हे माझे प्रतिज्ञापूर्वक सांगणे आहे.''

याचा अर्थच असा की, बाहेरून सतत स्वधर्माचरण करताना आतून चित्तशुद्धीची, ईश्वर स्मरणाची साधना सुरू असेल तर हे सतत ईश्वरमय राहणे शक्य आहे. अशाप्रकारे बाहेरून प्रवृत्ती व आतून निवृत्ती असा जीवनक्रम ठेवला तर अंतिम क्षण अमृतासारखा मधुर होईल. संत तुकाराम म्हणतात...



**रात्री दिवस आम्हा युद्धाचा प्रसंग ।**
**अंतर्बाह्य जग आणि मन ।।**

या त्रिगुणमयी सृष्टीच्या व्यापारात वावरत असताना मनाचा व बाह्य जगाचा सतत संघर्ष होत असतो. कधी जय, कधी पराजय, कधी सुख, कधी दुःख असा सतत जीवनप्रवाह आहे. या आशा-निराशेच्या संसार-सागरातील लाटांवरून आपली जीवननौका स्थिरपणे किनाऱ्यावर आणील तोच तरला!

मन-बुद्धी ईश्वरार्पण करणे म्हणजे संपूर्ण जीवनच आध्यात्मिक बनविणे होय. साधना ही काही क्षणाची न होता प्रत्येक क्षण हे साधनेचे अंग बनले पाहिजे. दिवसातील ठराविक क्षण ध्यान-पूजेसाठी व बाकीच्या वेळी सर्वसामान्यपणे विकारमय जीवन घालविणे हे गीतेला अपेक्षित नाही. 'सर्वेषु कालेषु' म्हणजे प्रत्येक क्षण...

**यत्करोषि यदश्नासि यज्जुहोषि ददासि यत्' ।**
**यत्तपस्यसि कौन्तेय तत्कुरुष्व मदर्पणम् ।। (९.२७)**

''हे कौंतेया! तू जे करतोस, जे खातोस, जे हवन करतोस, जे दान करतोस, जे तप करतोस, ते सर्व मला अर्पण करीत जा.''

मन-बुद्धी देणे म्हणजे ईश्वरार्पण बुद्धीने, शरणागत होऊन, निर्मम, निष्काम वृत्तीने जीवनाचे सर्व व्यवहार करणे हा आहे. असा अभ्यास जर सतत होत असेल, तरच शेवटचा क्षण पुण्यमय, अमृतमय होईल.

आठव्या श्लोकात भगवंतांनी हे सर्व शक्य होण्यासाठी अभ्यासयोगाचा मार्ग सांगितला आहे. या श्लोकावरील भाष्य करताना ज्ञानेश्वर महाराज म्हणतात,

**येणेचि अभ्यासेंसि योगु । चित्तासी करी पां चांगु ।**
**अगा उपायबळे पंगु । पहाड ठाकी ।।८१।।**
**तेविं सदभ्यासे निरंतर । चित्तासी परमपुरुषाची मोहर ।**
**लावी मग शरीर । असो अथवा जावो ।।८२।।**

''याच अभ्यासाबरोबर चित्ताची सांगड चांगल्या प्रकारे घाल. अरे, प्रयत्नाच्या बळावर पांगळादेखील पर्वत चढून जातो. त्याप्रमाणे सदभ्यासाने तू निरंतर आपल्या चित्ताला परमपुरुषाचे ध्यान लाव - मग शरीर राहो अथवा जावो.''

याप्रमाणे ते चित्तच चिद्रूप बनल्यावर मग त्या ठिकाणी जन्ममरणाचा शीण सहजच संपतो. कारण ते चैतन्य एकरस आनंद आहे. असा अभ्यास कधीही व्यर्थ जात नाही असा भगवंतांचा दिलासा आहे. एकदा का दृढनिश्चय झाला व ईश्वरी प्रेमाने अंतर्बाह्य रंगता आले की, ही प्रयाणकाळची परीक्षा अभ्यासयोगाने सहज पार करता येईल.

सातव्या श्लोकात जीवन जगण्याचा मंत्र गीताकारांनी दिला आहे. ''तस्मात्सर्वेषु कालेषु मामनुस्मर युध्य च'' - कोणत्याही स्थितीत सतत आपले

स्मरण करत युद्ध कर, असे भगवंताने अर्जुनास सांगितले. जीवन संघर्ष हेही युद्धच आहे. आत अंतःकरणातही युद्ध आहे व बाहेरच्या जीवनातही. माझे ध्यान करीत प्रयत्नशील राहून कर्मरत राहण्याचा हा उपदेश आहे. भगवंताच्या अनुसंधानात राहून प्रपंचाचे सर्व व्यवहार पार पाडले पाहिजेत. जे जे कर्म हातून घडेल ते ते सर्व भगवंताला अर्पण करून जीवन जगता आले तर शेवटच्या क्षणी अविचल राहून मृत्यूचा स्वीकार आनंदाने करता येईल. मृत्यूचा सोहळा होण्यासाठी, जीवनभर अनासक्त राहून ईश्वरार्पण बुद्धीने कर्म करण्याची पूर्वतयारी झाली पाहिजे. यासाठीच निरंतर अभ्यासाची गरज आहे. शरीर सोडावेच लागणार, मृत्यू स्वीकारावाच लागणार. मग तो स्वीकारताना आनंदाने, मृत्यूचे स्वागत करण्याची तयारी का करू नये? मृत्यूनंतर अपार शांती, परमानंद प्राप्त करण्यासाठी, जी शिदोरी घेऊन जायची आहे ती फक्त सत्कर्मरूपी पुण्याची! ज्या ज्या ठिकाणी मन आसक्त होते, वासनांध होते त्या त्या सर्व वस्तू इथेच सोडून जावे लागणार आहे. जन्म-मृत्यूचा फेरा चुकवायचा असेल तर सत्कर्माची पुण्याईच कामी येईल. मृत्यूचे भय हा जन्मभरचा क्लेश असतो. कारण ज्या ज्या ठिकाणी मन गुंतले होते ते सर्व सोडून द्यावे लागणार - तेही एका क्षणात. हा विचार सतत छळत असतो, पण ज्याची पूर्वतयारी उत्तम आहे त्याला भय कसले? ही निर्भयता या अभ्यासानेच निर्माण होईल. 'अभय' हा प्रथम क्रमांकाचा दैवी गुण आहे. तो गुण आत्मसात करण्यासाठी या क्लेशापासून मुक्ती मिळविली पाहिजे. आपले प्राण घरदार, दुकान, व्यवसाय, धन, प्रतिष्ठा, मान-अपमान, कीर्ती या सर्व ठिकाणी गुंतले आहेत. पत्नी-मुले-आप्तेष्ट यांचा मोह सोडवत नाही. या सर्वांवर कोणता ना कोणता आघात झाला की, आपले प्राण कासावीस होतात. क्लेश असह्य होतो. अहंकार, राग, द्वेष, अविद्या हे सर्व क्लेश त्यात भर घालत असतात. या सर्व दुःखातून सुटण्याचा मार्ग म्हणजे ज्ञान प्राप्त करणे. ज्ञानी व्यक्तींच्या सत्संगतीत राहून प्रपंचाचे स्वरूप ओळखणे. सेवा, प्रेम, शरणागतता यांनी सेवा करून भगवंताला प्रसन्न करणे हाच अभ्यास जीवनभर घडला पाहिजे. या अभ्यासाचा एक भाग म्हणून रोज असा विचार करावा की, या जगात भगवंताने मला आपला प्रतिनिधी म्हणून पाठविला आहे. काही काम करण्यासाठी. प्रपंचातल्या सर्व जबाबदाऱ्या, कर्तव्ये पार पाडताना 'ईश्वराचे काम' ही भावना ठेवून ते जर केले तर आपले जीवन सुगंधित होईल. अशी बुद्धी झाली तर, कर्मात अहंकार येणार नाही व 'माझे-मी' या ठिकाणी 'तुझे-तू' हेच येईल. त्यामुळे त्यात दोषही राहणार नाही.

जसे एखादी बँक एखाद्या विशिष्ट कामासाठी कर्ज देते, ज्या उद्योगासाठी किंवा फर्मसाठी, डेअरी, शेती इत्यादीसाठी दिले असेल त्याच कारणासाठी त्या कर्जाचा विनियोग करावा लागतो. कर्ज एका कारणासाठी घेऊन दुसऱ्या



कारणासाठी खर्च केले तर ते नियमबाह्य ठरते. बँकेकडील ज्या अटी-नियम मान्य केल्या असतील त्या सर्व पाळाव्या लागतात व घेतलेले कर्ज व्याजासह फेडावे लागते. नाही दिले तर बँक आपली ताकद खर्च करून पै न पै वसूल करते. परमात्म्याच्या बँकेतून कर्ज घेऊन आपण सर्व जीवन-व्यवहार करत असतो. त्याने इंद्रिये दिली, शक्ती दिली, भोग भोगण्यासाठी प्रपंचातल्या वस्तू दिल्या, त्याने काही नियम घालून दिले. परमात्म्याने आपल्याला जगात पाठविले. शरीर त्याचे, धन त्याचे, शक्ती त्याची... सर्व काही त्या परमेश्वराचे. असे असताना त्याने दिलेल्या कर्जावरील व्याज आपण फेडले का? फेडले नाही तर वसूल करण्याची व शिक्षा देण्याची तरतूद भगवंताच्या दरबारात आहे.

भगवंताचे कर्ज फेडण्याची उत्तम युक्ती म्हणजे समर्पण! त्याचा खरा प्रतिनिधी बनून त्यालाच संपूर्ण जीवन समर्पित करणे ही खरी भक्ती! प्रेमस्वरूप असलेल्या भगवंतावर अपार प्रेम करून जगणे हा खरा अभ्यास. असा अभ्यास झाला तर अंतिम क्षणी, शरीर सोडताना उत्तम गती प्राप्त झाल्याशिवाय राहणार नाही.

**कविं पुराणमनुशासितारमणोरणीयांसमनुस्मरेद्यः ।**
**सर्वस्य धातारमचिंत्यरूपमादित्यवर्णं तमसः परस्तात् ।।९।।**

"कवी म्हणजे सर्वज्ञ, पुरातन, शास्ता, अणूपेक्षाही लहान, सर्वांचा धाता म्हणजे आधार किंवा कर्ता, अचिंत्यस्वरूप व अंधकारापलीकडचा सूर्याप्रमाणे देदीप्यमान अशा पुरुषाचे जो सतत स्मरण करतो." ।।९।।

या श्लोकात भगवंताला अनेक विशेषणे लावली आहेत. भगवंताच्या दिव्य स्वरूपाचे हे वर्णन आहे. भगवंत कवी वाटले पाहिजेत. कवी म्हणजे ज्ञाता, क्रांतदर्शी. भगवान सर्वज्ञ आहे अशी दृढ भावना आली की भक्तीतील सकामता नाहीशी होते. याचना, मागण्या व रुदन संपले की भक्तीला तेज प्राप्त होते. भगवान नित्य, नूतन पुराणपरुष आहे. 'पुरा अपि नवं इति पुराणम्' जो प्राचीन असूनही नवा आहे. वर्तमानाप्रमाणेच भूत व भविष्य स्पष्ट जाणणारा ईश्वराशिवाय दुसरा कोण आहे? हा परमपुरुष 'अनुशासितारम्' म्हणजे विश्वाचे नियमन करणारा आहे. भगवान अणूहूनही सूक्ष्म आहेत. म्हणून अशा भगवंताला आपल्याजवळील सूक्ष्मातले सूक्ष्म असे मन, बुद्धी, अहं, अर्पण केले पाहिजेत. भगवंत सर्वांचे धारण-पोषण करणारा आहे. हे एकदा मनात दृढ झाले की 'मी' करतो ही भावना राहणार नाही. भगवान अचिंत्यरूप आहे; तेजस्वी आहे. आपले जीवनही तसेच तेजस्वी व्हायला पाहिजे. भगवान 'तमसः परस्तात्' आहे. अज्ञान, दुःख याच्या पलीकडे तो असल्यामुळे आपणही तसेच व्हायचे आहे. ईश्वर हा आनंदस्वरूप असल्यामुळे आपणसुद्धा सुख-दुःखाच्या पलीकडे असणारा, आनंदस्वरूप होईन, अशा दुःखातही आनंदाने राहण्याचा संदेश गीता देते.

पुढील चार श्लोकांत भगवान श्रीकृष्ण अर्जुनाला प्रयाणकाळच्या स्थितीचे व 'ॐ' या शब्द-ब्रह्माचे वर्णन करीत आहेत. ॐ हे एकाक्षरी शब्द ब्रह्माचे प्रतीक मानले जाते.

**प्रयाणकाले मनसाचलेन भक्त्या युक्तो योगबलेन चैव ।**
**भ्रुवोर्मध्ये प्राणमावेश्य सम्यक स तं परं पुरुषमुपैति दिव्यम् ।।१०।।**
**यदक्षरं वेदविदो वदन्ति विशन्ति यद्यतयो पीतरामाः'' ।**
**यदिच्छन्तो ब्रह्मचर्य चरन्ति तत्ते पदं संग्रहेण प्रवक्ष्ये ।।११।।**
**सर्वद्वाराणि संयम्य मनो हृदि निरुध्य च ।**
**मूर्ध्न्याधायात्मनः प्राणमास्थितो योगधारणाम् ।।१२।।**
**ॐ इत्येकाक्षरं ब्रह्म व्याहरन्मामनुस्मरन् ।**
**यः प्रयाति त्यजन्देहं स याति परमां गतिम् ।।१३।।**

''जो अंतकाली (इंद्रियनिग्रहरूप) योगाच्या सामर्थ्याने व भक्तीने युक्त होत्साता मन स्थिर करून, आणि प्राण दोन्ही भुवयांचे मध्ये नीट ठेवून देहत्याग करील तो (मनुष्य) त्याच दिव्य परमपुरुषाप्रत जाऊन पोचतो.

''वेदवेत्ते जे अक्षर म्हणतात, वीतराग होऊन यती ज्यात प्रवेश करतात आणि ज्याची इच्छा करून ब्रह्मचर्यव्रताचे आचरण करतात, ते पद म्हणजे ॐकारब्रह्म तुला संक्षेपाने सांगतो.'' ।।११।।

''सर्व (इंद्रियरूपी) द्वारांचे संयमन करून आणि मनाचा हृदयात निरोध करून आपला प्राण मस्तकात नेऊन समाधियोगात स्थिर झालेला...'' ।।१२।।

''ॐ या एकाक्षर ब्रह्माचा जप करीत जो माझे स्मरण करीत देह सोडून जातो त्याला उत्तम गती मिळते.'' ।।१३।।

प्रयाणकाळी भक्तीने मन अचल असले पाहिजे. गलितगात्र झालेल्या व निष्प्राण होत चाललेल्या इंद्रियांची धावपळ संपलेली असते, चैतन्य हळूहळू अंतर्धान पावत असते, घटाखाली झाकलेला दिवा जसा हळूहळू मिटत असतो तशी प्राणज्योत मिटत असते. अशा वेळी मनाची धाव संपून ते अचल स्थितीत येत असते... पण ही अचलावस्था चैतन्यहीनतेमुळे न येता भक्तियुक्त अंतःकरणाने आलेली असेल तरच उत्तम गती प्राप्त होण्याची शक्यता. देह सोडतानाही मन एकाग्र झाल्यामुळे जो भगवंताचे व आत्मस्वरूपाचे चिंतन करीत असतो तो अचल! भक्तिभावाने भरलेला व निश्चल, स्थिर मनाने शांत झालेला साधक योगबलाने प्रयाणकाली उत्तम गतीला पावतो. अशा वेळी वासनाशून्य अंतःकरणात केवळ भगवंताचे चिंतन असते. अशी स्थिती मात्र जीवनभराच्या तपाने, भगवंताचे काम केल्याने, यज्ञ, जप, नामस्मरणादि साधनेने प्राप्त होते. अंतिम क्षणी भगवंताचा धावा करून हे प्राप्य नाही. सर्व ऋषी-मुनी, साधू-संत, महात्मे यांच्या प्रयाणकाळची अवस्था 'मनसा अचलेन' अशी झालेली आहे. देहतादात्म्यता



नाहीशी झाल्याने व योगयुक्त व भक्तिपूर्ण अंतःकरणाने ईश्वररूप झाल्याने अशा जीवांना पुन्हा जन्म-मरणाचे फेरे करावे लागत नाहीत. अन्य साधारण जीवांचे तसे होत नाही.

जीवनभरची साधना ही अंतकाळची पुंजी! केलेली सत्कृत्ये, कल्याणकृत् कर्मे ही कधीही वाया जात नाहीत. प्रयाणकाळी त्यांचे योग्य ते फळ मिळते. गेल्या महिन्यात लौकिक दृष्टीने सामान्य पण आध्यात्मिक साधनेने अत्यंत तृप्त असलेल्या ९३ वर्षांच्या व्यक्तीचा अंतकाळ जवळून अनुभविला. शांत, स्थिर मनाने मृत्यूचे त्यांनी स्वागत केले. तगमग नाही, तडफड नाही, हाव, वासना नाही... उलट हास्य, विनोद करीत स्तोत्रे गात, स्वतःहून गंगाजल आणायला लावून सर्वांचा त्यांनी निरोप घेतला. देहक्लेश अटळ असतात. वेदना या जाणवणारच, पण तरीही आतली अवस्था स्थिर, शांत असेल तर भगवंत अशा वेळी त्यांना आत्मिक बळ देतो. आपल्या भक्ताच्या प्रयाणकाळी त्याला अलगद, हळुवार अशी साथ देतो. सामान्य माणसाच्या जीवनात थोड्या-फार साधनेने हे घडते, तर उच्च कोटीच्या साधकांची गोष्टच वेगळी.

या चार श्लोकांत 'ॐ' या एकाक्षर ब्रह्माचे माहात्म्य भगवंतांनी सांगितले आहे. 'ॐ' ही भगवंताची शब्द-प्रतिमा आहे, त्याचे रूप आहे. ही भगवंताची मोठी शक्ती आहे. यज्ञ, दान, तप ही कर्मे अत्यंत पवित्र आहेत; पण अशा कर्मांच्या आरंभी ॐकाराची योजना केली असता ती निर्विघ्नपणे पार पडतात व अपेक्षित फल प्राप्त होते. प्रणव हे ॐकाराचे दुसरे नाम.

मरणकाळी सर्व इंद्रिये विषय-पराङ्मुख करून, मन स्थिर, शांत ठेवून, हृदयातील प्राण सुषुम्नेतून ब्रह्मरंध्रात आणून योगाचरणामध्ये स्थिर होऊन, 'ॐ' या एकाक्षर शब्द-ब्रह्माचा जप करीत व माझे स्मरण करीत जो देह सोडतो तो माझ्या स्वरूपाला निश्चयाने पावतो, अशी भगवंताची स्पष्टोक्ती आहे.

श्री ज्ञानेश्वरांच्या शब्दात,

**म्हणोनि प्रणवैकनाम । हे एकाक्षर ब्रह्म ।**
**जो माझे स्वरूप परम । स्मरतसांता ।।१८।।**
**यापरी त्यजी देहाते । तो त्रिशुद्धी पावे माते ।**
**जया पावणया परौते । आणिक पावणे नाही ।।१९।।**

''म्हणून प्रणव हे एक ज्याचे नाम आहे व जे एकाक्षर ब्रह्म आहे ते माझे मुख्य स्वरूप असून त्या स्वरूपाचे स्मरण करीत असताना जो अशा स्थितीतच देहाचा त्याग करतो, तो ज्या (ब्रह्म) प्राप्तीपलीकडे दुसरी काही एक गोष्ट साध्य करावयाची नाही, त्या माझ्या स्वरूपाला निश्चयाने पावतो.''

पण हा मार्ग योगसिद्ध पुरुषासच जमण्यासारखा आहे. सामान्यांचा नाही. कारण मृत्युसमयी अत्यंत व्याकूळ अवस्था होत असल्याने प्राण आपल्या स्वाधीन

राहत नाही. ही अडचण, अवस्था समजून भगवान श्रीकृष्ण सामान्य जीवांसाठी दुसरा मार्ग दाखवीत आहेत -

**अनन्यचेताः सततं यो मां स्मरति नित्यशः ।**
**तस्याहं सुलभः पार्थ नित्ययुक्तस्य योगिनः ।।१४।।**
**मामुपेत्य पुनर्जन्म दुःखालयमशाश्वतम् ।**
**नाप्नुवन्ति महात्मानः संसिद्धिं परमां गताः ।।१५।।**
**आब्रह्म भुवनाल्लोकाः पुनरावर्तिनोऽर्जुन ।**
**मामुपेत्य तु कौन्तेय पुनर्जन्म न विद्यते ।।१६।।**

"हे पार्था, अनन्यभावाने सदासर्वदा जो माझे नित्यशः स्मरण करितो त्या नित्ययुक्त योग्यास मी म्हणजे माझी प्राप्ती सुलभ रीतीनें होते." ।।१४।।

"मला येऊन मिळाल्यावर परमसिद्धी पावलेल्या महात्म्यास दुःखाचे घर व अशाश्वत असा पुनर्जन्म प्राप्त होत नाही." ।।१५।।

"हे अर्जुना! ब्रह्मलोकासुद्धा (स्वर्गादि) जे लोक आहेत तेथून (केव्हा ना केव्हा तरी या लोकी) पुनरावर्तन म्हणजे परत फिरणे (भाग) आहे; पण हे कौन्तेया! मला येऊन मिळाले म्हणजे पुनर्जन्म नाही." ।।१६।।

'अनन्यचेताः' ही श्रेष्ठ भक्ताची स्थिती आहे. भगवंताचा हा आग्रह आहे, म्हणून पुनःपुन्हा हा शब्दप्रयोग इतरत्रही वापरला आह. 'मयि चानन्ययोगेन भक्तिरव्यभिचारिणी (१३.१०)' व 'अनन्याश्चिन्तयन्तो मां ये जनाः पर्युपासते (९.२२)' ईश्वरावरच्या परमप्रेमाने केवळ त्याचेच सदैव चिंतन करणे. तेही निर्हेतुक, निष्काम भावनेने! भगवंत हेच सर्वस्व समजून इतरत्र कोठेही आसक्ती न ठेवता केवळ ईश्वरचरणी शरणागत होणे म्हणजे अनन्यता! ईश्वराला सर्वश्रेष्ठ मानून, विषय-चिंतन सोडून त्याचेच ध्यान करणे, आपल्या सर्व कर्माद्वारे त्याचेच पूजन करणे म्हणजे अनन्यता!! जीवनात आपल्याला अनेक गोष्टी हव्या असतात. अशा अनेक वस्तूंबरोबर आपल्याला भगवंतही हवा असतो. दुःखाने होरपळला की, मनुष्याला भगवंताची आठवण होते. यशापयशाच्या वेळी ईश्वराचे स्मरण होते. अनेक भाव चित्तात असतात. अशा अनेक कारणांनी भगवंताचे स्मरण होत असते. पण ही अनन्यता नव्हे. जेव्हा ईश्वराशिवाय दुसरा कोणताही भाव चित्तात नसेल तेव्हाच अनन्यता असते. आत्यंतिक प्रेमाने, भक्तीने सदासर्वदा ईश्वरचिंतन करणाऱ्या, अशा अनन्यचेतस् असणाऱ्या भक्तांना त्यांच्या प्रयाणकाळीही भगवंत मदत करतात. अशा भक्तांच्या जीवनात प्रभू सदैव वास करीत असतो. श्री ज्ञानेश्वर माऊली यावर निरूपण करताना म्हणतात -

**ऐसे निरंतर एकवटले । ते अंतःकरणी मज़सी लिगटले ।**
**मीचि होऊनि आटले । उपासिती ।।१२६।।**

"अशा प्रकारे जे अखंड माझ्याशी एकरूप होऊन अंतःकरणाने मला चिकटले,



ते मद्रूप होऊन माझीच भक्ती करतात. अशा भक्तांची विषयासक्ती सुटलेली असते, त्यांची देहतादात्म्यता गेलेली असते. भगवंताशी नित्य जडलेल्या अशा भक्तांच्या अंतःकरणात भगवंताचे नेहमी वास्तव्य असते. देहत्यागानंतर ते भक्त ईश्वररूपच होतात.

मृत्यूनंतर त्यांना पुन्हा दुःखाची खाई म्हणजे पुनर्जन्म मिळत नाही, हे भगवंताचे आश्वासन आहे. जन्म-मृत्यूच्या रहाटगाडग्यातून सुटका होऊन तो अक्षयसुखाचा धनी होतो. जीवाच्या पुनर्जन्माचे कारण अज्ञान असते. 'अहं - मी आहे' हा अहंकार असल्यामुळे ब्रह्मलोकाप्रत जाऊनसुद्धा जीवांना पुन्हा जन्म घ्यावा लागतो. पुण्यक्षय झाल्यानंतर स्वर्गातून मर्त्यलोकी पुनश्च यावे लागते. पण 'मामुपेत्य' म्हणजे भगवंताला येऊन मिळाले की पुनर्जन्म नाही.

आता पुढील श्लोकात, भगवंत ब्रह्मदेवाचा दिवस व रात्र तसेच भूतमात्राचा प्रभव-प्रलय यासंबंधी निर्देश करीत आहेत.

**सहस्रयुगपर्यंतमहर्यद्ब्रह्मणो विदुः ।**
**रात्रिं युगसहस्रान्तां तेऽहोरात्रविदो जनाः ।।१७।।**
**अव्यक्ताद्व्यक्तयः सर्वाः प्रभवन्त्यहरागमे ।**
**रात्र्यागमे प्रलीयन्ते तत्रैवाव्यक्तसंज्ञके ।।१८।।**
**भूतग्रामः स एवायं भूत्वा भूत्वा प्रलीयते ।**
**रात्र्यागमेऽवशः पार्थ प्रभवत्यहरागमे ।।१९।।**

"अहोरात्र म्हणजे काय हे (तत्त्वतः) जाणणारे पुरुष (कृत, त्रेता, द्वापर व कली ही चार युगे मिळून एक महायुग व अशा) हजार (महा) युगांचा जो काल तो ब्रह्मदेवाचा एक दिवस आणि (तसल्याच) हजार युगांची एक रात्र होते असे समजतात." ।।१७।।

"हा (ब्रह्मदेवाचा) दिवस सुरू झाला म्हणजे अव्यक्तापासून सर्व व्यक्त (पदार्थ) निर्माण होतात आणि रात्र सुरू झाली म्हणजे त्याच पूर्वोक्त अव्यक्तात लय पावतात." ।।१८।।

"भूतांचा तोच हा समुदाय (या प्रमाणे) पुनःपुन्हा जन्मून अवश होत्साता म्हणजे स्वतः इच्छा असो वा नसो (यंत्रात घातल्याप्रमाणे) रात्र सुरू झाली की लय पावतो, आणि हे पार्था! दिवस सुरू झाला की (पुन्हा) जन्मतो." ।।१९।।

कृत, त्रेता, द्वापर व कली अशा चार युगांच्या सहस्र चौकड्या म्हणजे ब्रह्मदेवाचा एक दिवस व तेवढीच रात्र मोठी. ब्रह्मदेवाच्या दिवसरात्रीच्या प्रमाणांबद्दल मनुस्मृतीत पहिल्या अध्यायात उल्लेख आले आहेत.

ब्रह्मदेव हे अव्यक्त प्रकृतीचेच प्रतीक आहे. अव्यक्त म्हणजे ब्रह्मदेवाची सुप्तावस्था. निद्रित झाले की सर्व जग लयाला जाते. ते जागे झाले की जग पुन्हा निर्माण होते. ब्रह्मदेवाच्या रात्रीबरोबर जर अनायासे अव्यक्तात लीन होता येते

तर मोक्षासाठी वेगळ्या अथक प्रयत्नांची आवश्यकता काय, अशी शंका येणे स्वाभाविक आहे. म्हणूनच त्याचेही उत्तर भगवंत इथे १९ व्याश्लोकात देतात. अव्यक्तात वस्तू लीन झाल्या तरी पुन्हा त्या प्रगट होतात. मग अनायासे मुक्ती कशी मिळेल? प्रयत्न केले नाहीत, तर जन्म-मरणाचे चक्र चालूच राहते. मनुष्य गाढ झोपेत गेला की दुःखाच्या भोवऱ्यात सापडतो. तसे, जर साधना केली नाही, अज्ञानाच्या अंधारातून प्रकाशाकडे वाटचाल केली नाही, तर पुनःपुन्हा जन्ममरणाचा फेरा अटळ आहे. नामरूपात्मक सर्व पदार्थ विकारशील आहेत. जे जे इंद्रियगोचर आहे त्याचे परिवर्तन होणारच. जोपर्यंत जीवाला अभिमान, अहं, वासना, विकार आहेत तोपर्यंत तो मृत्यू जरी पावला तरी ईश्वरी नियमानुसार योग्य काळ येताच तो पुन्हा जन्म घेतो.

ब्रह्मदेवापेक्षाही श्रेष्ठ असे जे अक्षरतत्त्व आहे की ज्याला श्रुती परमगती म्हणते, त्या परमस्थानाचे वर्णन पुढील तीन श्लोकांत केले आहे.

**परस्तस्मात्तु भावोऽन्योऽव्यक्तोऽव्यक्तात्सनातनः ।**
**यःस सर्वेषु भूतेषु नश्यत्सु न विनश्यति ।।२०।।**
**अव्यक्तोऽक्षर इत्युक्तस्तमाहुः परमां गतिम् ।**
**यं प्राप्य न निवर्तन्ते तद्धाम परमं मम ।।२१।।**
**पुरुषः स परः पार्थ भक्त्या लभ्यस्त्वनन्यया ।**
**यस्यांतः स्थानि भूतानि येन सर्वमिदं ततम् ।।२२।।**

"पण या वर सांगितलेल्या अव्यक्तापलीकडचा दुसरा सनातन अव्यक्त पदार्थ, जो सर्व भूते नाहीशी झाली तरीही नाहीसा होत नाही." ।।२०।।

"ज्या अव्यक्ताला 'अक्षर' असेही म्हणतात. तोच परम म्हणजे उत्कृष्ट किंवा अखेरची गती म्हटली आहे व ज्याला जाऊन पोचले असता फिरून जन्मास येत नाही (असे) माझे परमस्थान तेच होय." ।।२१।।

"हे पार्था! ज्याच्या आत (सर्व) भूते आहेत व ज्याने हे सर्व विस्तारले आहे तो पर म्हणजे श्रेष्ठ पुरुष अनन्य भक्तीने लभ्य होय." ।।२२।।

अक्षरतत्त्व म्हणजे परमात्मा हे सनातन अव्यक्त तत्त्व आहे. ते सर्व भूतांत आहे. पण सर्व भूते लयाला गेली तरीही ते नाहीसे होत नाही. म्हणून ते अक्षर आहे. अव्यक्त, अक्षर अशी अत्यंत श्रेष्ठ गती मिळाली की पुनरावृत्ती नाही. कारण तेच भगवंताचे सर्वश्रेष्ठ स्वरूप होय. त्या स्वरूपात अक्षय सुख साठले आहे. अशा स्वरूपाची प्राप्ती ज्ञान, प्रेम व अनन्यभक्तीनेच होते, हे पुन्हा एकवार भगवान कथन करतात.

मनुष्याच्या गतीचे दोन भाग पुढील श्लोकांत दाखविले आहेत -

**यत्र काले त्वनावृत्तिमावृत्तिं चैव योगिनः ।**
**प्रयाता यान्ति तं कालं वक्ष्यामि भरतर्षभ ।।२३।।**



**अग्निर्ज्योतिरहः शुक्लः षण्मासा उत्तरायणम् ।**
**तत्र प्रयाता गच्छन्ति ब्रह्म ब्रह्मविदो जनाः ।।२४।।**
**धूमो रात्रिस्तथा कृष्णःषण्मासा दक्षिणायनम् ।**
**तत्र चांद्रमसं ज्योतिर्योगी प्राप्य निवर्तते ।।२५।।**
**शुक्लकृष्णे गती ह्येते जगतः शाश्वते मते ।**
**एकया यात्यनावृत्तिमन्ययावर्तते पुनः ।।२६।।**

"आता योगी ज्या काली मरण पावले असता परत (या लोकी जन्मास) येत नाहीत आणि (ज्या काली मृत्यू पावले असता) परत येतात, तो काल हे भरत-श्रेष्ठा! तुला सांगतो." ।।२३।।

"अग्नी, ज्योती म्हणजे ज्वाला, दिवस, शुक्लपक्ष, उत्तरायणाचे सहा महिने, यात मरण पावलेले ब्रह्मवेत्ते ब्रह्मलोकी पोचतात, (ते परत येत नाहीत.)" ।।२४।।

"धूर, रात्र तसेच कृष्णपक्ष, दक्षिणायनाचे सहा महिने, यांत (मृत्यू पावलेले) योगी चंद्राच्या तेजास म्हणजे चंद्रलोकास जाऊन (पुण्यांश सरल्यावर) परत येतात." ।।२५।।

"याप्रमाणे शुक्ल व कृष्ण म्हणजे प्रकाशमय व अंधकारमय अशा जगताच्या दोन शाश्वत गती म्हणजे कायमचे मार्ग मानले आहेत. एका मार्गाने गेले म्हणजे परत फिरत नाही व तो दुसऱ्याने पुन्हा परत येतो." ।।२६।।

- हे श्लोक थोडे वादग्रस्त आहेत. विचारांचा गोंधळ उडवून देणारे हे श्लोक शब्दार्थाने, वाच्यार्थाने न पाहता ते एक रूपक म्हणून पाहावेत म्हणजे शंकांचे काहूर उठणार नाही. लोक ह्याचा असा अर्थ करतात की, जो दिवसा मरतो तो चांगला व रात्री मरतो तो पापी. पण पुष्कळ उच्च कोटीला पोहोचलेली माणसे रात्री मरण पावली आहेत. शुक्लगती व कृष्णगती अशा दोन गती आहेत. शुक्लपक्षात मृत्यू पावलेला पुण्यवान व कृष्णपक्षात मरण पावलेला पापी असा अर्थ येथे अभिप्रेत नाही. या श्लोकांत जे सांगितले आहे त्यावरून दिसते की, जो योगी वद्यपक्षात किंवा दक्षिणायनात देह सोडतो तो कमी योग्यतेचा आहे. महाभारतात भीष्म शरपंजरी पडले तेव्हा दक्षिणायन होते म्हणून त्यांनी देह सोडला नाही व उत्तरायण सुरू झाल्यावर देह सोडला असे वर्णन आहे. हे श्लोक शब्दार्थाने पाहिले की असा समज होतो की, ज्या महात्म्यांनी वद्यपक्षात देह सोडला त्यांना पुनर्जन्म आहे व ते कमी योग्यतेचे होत. महाराष्ट्राचे पंचप्राण असणारे पाच संत शुक्लपक्षात न जाता वद्यपक्षात गेले म्हणून ते कमी योग्यतेचे होते असे समजणे तर्कदृष्ट्या तरी पटेल का? महाविष्णूंचा अवतार म्हणून ज्यांना शिरोधार्य मानले आहे, त्या भागवत धर्माचा पाया रचणारे ज्ञानेश्वर यांचा निर्वाणकाळ कार्तिक वद्य १३ आहे.

"आम्ही वैकुंठवासी" असे सांगणारे संत तुकाराम यांचा निर्वाणकाळ फाल्गुन

वद्य २, संतशिरोमणी नामदेवांचा आषाढ वद्य १३, श्रीखंड्या होऊन ज्यांच्या घरी भगवंतांनी स्वकरे चंदन घासले, त्या एकनाथी भागवतकार एकनाथांचा फाल्गुन वद्य ६, महाराष्ट्र धर्म ज्यांनी जागविला त्या रामभक्त रामदासांचा माघ वद्य ९ असा निर्वाणकाळ आहे.

निर्वाणकाळाबद्दल बृहदारण्यकोपनिषद्, छांदोग्य उपनिषदात सखोल चर्चा केली गेली आहे. हे जे अर्चिरादी व धूम्रमार्ग आहेत, त्यांना देवयान व पितृयान अशीही नावे आहेत. दिवस, उत्तरायण वगैरे शब्दांचा अर्थ करताना तद्‌भिमानी देवता असा अर्थ केला जातो व त्या त्या देवता योग्याला निरनिराळ्या मार्गाने नेतात, असे सांगितले आहे. शंकराचार्यांनी अहर्देवता, शुक्लपक्ष देवता, कृष्णपक्ष देवता अशा तऱ्हेने आपल्या भाष्यात उल्लेख केले आहेत.

याच अध्यायातील श्लोक १४ व १५ यांत भगवंतांनी स्पष्ट खुलासा केला आहे की, जो अनन्यभावाने सदासर्वदा परमेश्वराचे नित्यशः स्मरण करतो त्या योग्याला परमेश्वराची प्राप्ती सुलभ रीतीने होते व परमेश्वराला जाऊन मिळाल्यावर त्याला जन्म-मृत्यूचे फेरे करावे लागत नाहीत.

जर असे आहे तर या श्लोकांचा अन्वयार्थ लावायचा कसा? ज्यांनी गीता प्रत्यक्ष जगून दाखविली, त्या महात्मा गांधींनादेखील या श्लोकाच्या अर्थाबद्दल संभ्रम निर्माण झाला होता. अशा वेळी ते पूज्य विनोबाजींकडून शंका निरसन करून घेत. या श्लोकांच्या अर्थाविषयी विनोबांनी स्पष्ट म्हटले आहे की, हे रूपक आहे. परमेश्वरावर प्रगाढ श्रद्धा ठेवून कायावाचामने, शरणागत होऊन त्याला सर्वस्व समर्पण कराल तर अंतकाळची घडी अतिशय उत्तम येईल. विनोबा म्हणतात की, अग्नी हे कर्माचे चिन्ह आहे. यज्ञाची खूण आहे. अंतकाळीसुद्धा यज्ञाची ज्वाला पेटलेली पाहिजे. पेटलेला अग्नी याचा अर्थ असा की, अखेरच्या श्वासापर्यंत कर्तव्यकर्म करीत राहिले पाहिजे. मरणकाळीही कर्म करीत राहणे ही अग्नीची कृपा! सूर्याची कृपा म्हणजे बुद्धीची प्रभा. शेवटपर्यंत झगझगीत राहणे. चंद्राची कृपा म्हणजे मृत्युसमयी पवित्र भावना वाढत जाणे. चंद्र ही मनाची, भावनांची देवता आहे. शुक्लपक्षातील चंद्राप्रमाणे मनातील प्रेम, भक्ती, उत्साह, दया, करुणा, परोपकार... अशा शुद्ध भावनांचा परिपोष व्हावा. आकाशाची कृपा म्हणजे हृदयाकाशात आसक्तीचे ढग नसणे, हेच उत्तरायण! शेवटच्या श्वासापर्यंत हातून उत्तम दैवी काम, सेवा होऊन राहिली आहे, भावभावनांची पौर्णिमा फुलली आहे, हृदयाकाशात यत्किंचितही आसक्ती नाही, बुद्धी सतेज आहे. अशा प्रकारे मरण ज्याला येईल तो परमात्म्यात मिळाला. असा परममंगल शेवट होण्यास सतत अनन्यचित्ताने त्या परमेश्वराची आराधना करीत राहिले पाहिजे.

अमुक वेळेला देहावसान झाले तर अर्चिरादि मार्ग व अमुक वेळेला मृत्यू



आला तर धूम्रमार्ग हा विचार श्री ज्ञानेश्वर माऊलींनाही पटला नाही. म्हणून याच अध्यायात ते पुढील श्लोकात स्पष्ट म्हणतात की,

**तरी आता देह असो अथवा जावो ।**
**आम्ही तो केवळ वस्तूचि आहो ।**
**का जे दोरी सर्पत्व वावो ।**
**दोराचिकडूनि ।।२४८।।**
**मग मार्ग तैं कायसा शोधावे ।**
**कोणें कोठूनि कें जावें ।**
**जरी देशकालादि आघवे ।**
**आपणचि असिजे ।।२५२।।**

"तर आता देह असो अथवा जावो, आम्ही तर केवळ (ब्रह्मच) आहोत. कारण की, जसे दोरीवर भासलेला सर्पपणा दोरीच्या दृष्टीने मिथ्या आहे."

"जर सर्व देश व काल आपणच आहोत तर मग हे अर्चिरादि अथवा धूम्रमार्ग कशाला शोधावे? आणि कोणी कोठून कोठे जावयाचे?"

पुढे घटाचा दृष्टान्तही माऊलींनी सांगितला आहे. घट ज्या वेळेला फुटतो, त्या वेळी घटातील आकाश महाकाशाला मिळायचे चुकेल काय? घटाचा आकारच फक्त नाहीसा होतो. वास्तविक पाहिले तर घटपणाच्या आधीही (त्यातील) आकाश, आकाशाच्या ठिकाणी आहे. स्वरूपाचे ज्ञान झाल्यावर हे मार्गामार्गाचे संकट त्या योग्यांना पडत नाही. मग वाटेल तेथे वाटेल तेव्हा देहाचा पाश असो अथवा जावो, परंतु बंधरहित अखंड ब्रह्मस्थितीत बिघाड येणार नाही.

म्हणून पहिला मार्ग प्रकाशाचा व दुसरा मार्ग अंधाराचा. जो योगी भक्तिज्ञानाच्या प्रकाशाने उजळून निघाला आहे तो पहिल्या मार्गाने जाऊन ब्रह्मपदास पोहोचतो व पुनर्जन्माच्या फेऱ्यातून सुटतो. ज्या योग्याला भक्ति-ज्ञानाचा प्रकाश मिळाला नाही व जो अंधारात चाचपडत आहे तो दुसऱ्या मार्गाने जातो व पुन्हा जन्मास येतो, असा वरील श्लोकांचा अर्थ आहे.

- शेवटच्या दोन श्लोकांत अर्जुनाला "तू योगी हो" असे भगवंत सांगत आहेत. आठव्या अध्यायाचे फळच भगवंतांनी या दोन श्लोकांत सांगितले आहे.

**नैते सृती पार्थ जानन् योगी मुह्यति कश्चन ।**
**तस्मात्सर्वेषु कालेषु योगयुक्तो भवार्जुन ।।२७।।**
**वेदेषु यज्ञेषु तपःसु चैव दानेषु यत्पुण्यफलं प्रदिष्टम् ।**
**अत्येति तत्सर्वमिदं विदित्वा योगीपरं स्थानमुपैति चाद्यम् ।।२८।।**

"हे पार्था! या दोन सृती म्हणजे मार्ग (तत्त्वतः) जाणणारा कोणताही योगी मोह पावत नाही. म्हणून अर्जुना! तू सर्वकाल योगयुक्त हो." ।।२७।।

"हे (वर सांगितलेले तत्त्व) जाणले म्हणजे वेदांमध्ये यज्ञामध्ये, तपामध्ये

आणि दानामध्ये जे पुण्यफल सांगितले आहे, ते सर्व, योगी मागे टाकतो आणि त्याच्या पलीकडच्या आद्यस्थानाला जाऊन पोचतो." ।।२८।।

'सर्वकाळ अनन्यभावाने भगवंताचे ध्यान करावे' हा आठव्या अध्यायाचा संदेश आहे. कारण प्रारब्धवशात्, अकस्मात् मृत्यू केव्हा येईल हे अनाकलनीय आहे. त्यामुळे देहवान असतानाच अत्मज्ञान झाले तर संसारादी उपाधीही शिल्लक राहणार नाही. अशा योग्याला स्वरूपाचे ज्ञान झाल्यामुळे निर्वाणानंतरच्या गतीचा विचार करण्याचे कारण नाही. म्हणून अर्जुनाला "तू सर्वकाळ योगसंपन्न हो" असे भगवंत सांगत आहेत. असा योगी जीवनात कोणत्याही क्षणी मोहग्रस्त होत नाही.

मानवाच्या विकासाची चार साधने शेवटच्या श्लोकांत सांगितली आहे. वेदांचा अभ्यास, यज्ञयागादी कर्मे, तप व दान ही चार साधने होत. वेदांच्या अध्ययनाने चित्तशुद्धी होते व तो ज्ञानसंपन्न होतो. ईश्वराने दिलेली वाणी सार्थ होते. जीव, जगत्, जगदीश्वर यांचे ज्ञान होते; पण आत्मसुख तरीही दूरच राहते. यज्ञयाग म्हणजे इंद्रचंद्रादि देवतांना संतुष्ट करण्यासाठी तीळ, तूप अशी द्रव्ये हवन करणे. तप म्हणजे शास्त्रीय पद्धतीने शरीराला क्लेश देणे. दान म्हणजे एखाद्या वस्तूवरचे आपले स्थामित्व सोडून दुसऱ्याला अनुपकार बुद्धीने अर्पण करणे.

या चारीही साधनांमध्ये जे पुण्यफल सांगितले आहे, त्या सर्वांपेक्षा जीव व ब्रह्म ह्यांचे ऐक्य हे श्रेष्ठ फळ आहे. या सर्वांचे एकत्रित पुण्यफल हे त्या नित्य-शुद्ध परमात्म्याच्या तुलनेत गौण आहे. वेदयज्ञादी साधने ही सुखाच्या प्राप्तीसाठीच आहेत. पण त्या अक्षय, अमृततुल्य ब्रह्मसुखाच्या तुलनेत ती मागे पडतात. भगवंताचे स्थान हे अत्युत्कृष्ट स्थान आहे.

२८ श्लोकांचा हा आठवा अध्याय आकाराने लहान असला तरी अर्थाने महान आहे.

**।। श्रीकृष्णार्पणमस्तु ।।**



# सर्वांसाठी गीता

## एक जीवनग्रंथ

भाग-२

## लेखक परिचय

| | | |
|---|---|---|
| नाव | : | प्रा. दत्तात्रय नारायण दुभाषी |
| जन्म | : | १९ जानेवारी १९४१<br>बेळगाव |
| शिक्षण | : | १) एम. ए. (इंग्रजी - संस्कृत)<br>२) एम. ए. (मराठी) |
| व्यवसाय | : | पत्रकार व माध्यमिक शिक्षक म्हणून १० वर्षे<br>महाविद्यालयीन प्राध्यापक म्हणून ३० वर्षे<br>अशी एकूण ४० वर्षे सेवा.<br>गोपाळकृष्ण गोखले कॉलेज, कोल्हापूर येथून इंग्रजी विभागप्रमुख म्हणून निवृत्त. |
| छंद व आवड | : | • सतत भ्रमण - ५ वेळा अमेरिका-कॅनडा येथे प्रदीर्घ वास्तव्य. युरोप-मिडलईस्ट इ. ठिकाणचा प्रवास.<br>• वक्तृत्व - नाट्य - लेखन यांच्या विशेष आवडीमुळे वर्तमानपत्रे व मासिकांतून अनेक विषयांवर व्याख्याने व लेखन – निसर्गात पदभ्रमणाची विशेष आवड.<br>• योग-प्राणायाम यावर प्रबोधन - व्याख्याने व प्रात्यक्षिके. |
| सामाजिक कार्य | : | • श्री ज्ञानेश्वरी, तुकाराम गाथा अशा संतसाहित्यावर व भगवद्गीतेवर गेली १५ वर्षे सतत प्रवचने व व्याख्याने यातून समाजप्रबोधन.<br>• गीता व ज्ञानेश्वरी यावरीललेखमाला प्रसिद्ध.<br>• अध्यात्म व तत्त्वज्ञान याचा प्रचार व प्रसार हेच जीवनध्येय |